# भारतीय शिक्षणव्यवस्था आणि मराठी माध्यमाचा प्रश्न

नेमाडेंच्या देशीयता ह्या संकल्पनेचा सविस्तर झाडा घेतल्यानंतर त्यांच्या भाषाविषयक विचाराकडे सहज वळता येईल. नेमाडेंचा भाषाविषयक विचार हा प्रामुख्याने 'साहित्याची भाषा' या ग्रंथात समाविष्ट आहे. ह्याखेरीज 'टीकास्वयंवर' या ग्रंथातील 'भारतीयांचे इंग्रजी लेखन', 'ॲन अँथॉलॉजी ऑफ मराठी पोएट्री', 'मराठी कवितेची इंग्रजी भाषांतरे', सुर्वे, करंदीकर, संत', 'अरुण कोल्टकर : द्वीभाषीक कवित्व', 'इंग्रजीचा मराठीवरील प्रभाव' आदी लेखांत त्यांचा भाषाविचार संकलित झाला आहे. 'साहित्याची भाषा' या ग्रंथातील जवळजवळ सर्वच विचार हे पाश्चात्त्य भाषाविज्ञान व शैलीविज्ञानातून उसने घेतलेले आहेत. ते कोणत्याही अर्थाने देशी नाहीत. त्यामुळे देशीयतेच्या संदर्भात त्यांचा विचार करण्याची आवश्यकता नाही. मुळातच त्यातील विचारांशी फारसे मतभेद नसल्याने हे मान्य करायला काहीच हरकत नाही. इथे इंग्रजी भाषेचा विचार करतानाच मी आपल्या संपूर्ण शिक्षणपद्धतीचा विचार जाणीवपूर्वकच मांडला आहे; कारण मुख्य उपाययोजना शिक्षणातच असते. नेमाडेंनी तिचा विचार केला नाही तरी आपणास तो केलाच पाहिजे. देशीयतेच्या अनुषंगाने नेमाडेंनी जो विचार मांडला आहे त्यात खालील गोष्टी महत्त्वाच्या आहेत.

१. देशीयता ही फक्त देशी भाषेतच चांगल्या रीतीने व्यक्त होते.

२. इंग्रजी ही परकीय भाषा आहे व तिचे भाषिक वर्चस्व आपण सहन करू नये.

"टीकास्वयंवर" मधील सर्व लेखांवर ह्या दोन मुख्य विचारांचा प्रामुख्याने प्रभाव पडला आहे. 'भारतीयांचे इंग्रजी लेखन' ह्या लेखात त्याचा सविस्तर विचार नेमाडेंनी केला आहे.

आज झपाट्याने बदलत चाललेल्या जगात इंग्रजीचा विचार करताना आपणाला सात प्रकारचे इंग्रजी भाषिक विचारात घ्यावे लागतात.

१. ज्यांची इंग्रजी ही मातृभाषा आहे आणि ज्यांच्या पूर्वजांची भाषा इंग्रजीच होते असे लोक.

२. ज्यांचे आई-वडील इंग्रजी भाषीक नव्हते, तर वेगवेगळ्या भाषांत वाढलेले होते, पण ज्यांची आपापसांत बोलण्याची संपर्क-भाषा इंग्रजी होती आणि त्यामुळे ज्यांच्या मुलांची इंग्रजी

हीच कुटुंबभाषा बनली असे इंग्रजीभाषिक लोक.

३. ज्यांचे आई-वडील इतर भाषिक असून ज्यांची कुटुंबभाषा इंग्रजेतर होती, ज्यांचे शिक्षणाचे माध्यमही इंग्रजेत्तर होते; पण ज्यांना संशोधन, नोकरी वा व्यापारधंद्यानिमित्त इंग्रजी भाषिक राष्ट्रात स्थायिक व्हावे लागले असे इंग्रजी भाषिक लोक. (अ) त्यातही आपली मातृभाषा सरावाने कायम ठेवणारे व (ब) आपली मातृभाषा जे इंग्रजीच्या अपरिहार्य वापराने मातृभाषेच्या सरावाला पारखे होऊन तिला गमावून बसलेले लोक.

४) आपल्या ज्ञानाचा आवाका वाढावा म्हणून इंग्रजी शिकून आवश्यकता असेल तिथे, इंग्रजी बोलणारे इंग्रजेतर लोक.

५) केवळ हौस म्हणून इंग्रजी भाषा शिकणारे इंग्रजी भाषिक इंग्रजेतर लोक.

६) ज्यांचे आईवडील इंग्रजेतर असून ज्यांची कुटुंबभाषाही इंग्रजेतर आहे, पण ज्यांच्या आईवडिलांनी व्यवहारिक फायदा आहे असे गृहीत धरून ज्यांना इंग्रजी माध्यमात घातले आणि त्यामुळे जे इंग्रजीत बोलतात असे लोक.

७) ज्यांचे आईवडील इंग्रजेतर आहेत, ज्यांची कुटुंबभाषा इंग्रजेतर आहे आणि ज्यांचे शिक्षण इंग्रजेतर भाषेत होऊनही जे केवळ इम्प्रेशन मारण्यासाठी किंवा आंतराष्ट्रीय होण्यासाठी इंग्रजीत बोलतात व लिहितात असे लोक.

ह्यातील पहिल्या प्रकारचे, चौथ्या प्रकारचे व पाचव्या प्रकारचे इंग्रजीभाषिक लोक नेमाडेंना मान्य आहेत असे त्यांच्या विवेचनावरून वाटते. दुसऱ्या, तिसऱ्या, सहाव्या प्रकारांविषयी त्यांची मते नीट व्यक्त झालेली नाहीत. सातव्या प्रकाराला त्यांचा कट्टर विरोध आहे. सहाव्या प्रकारालाही त्यांचा असाच विरोध दिसतो. मात्र इंग्रजी माध्यमाच्या शाळा बंद कराव्यात असे मात्र नेमाडे चुकूनही कुठे म्हणत नाहीत हे लक्षात घेण्याजोगे आहे. वास्तविक नेमाडेंचे भाषाविषयक विचार बघता ही मागणी त्यांनी ठामपणे करायला हवी होती. यातील सातव्या प्रकारात इंग्रजीत लेखन करणाऱ्यांना नेमाडेंनी केलेला विरोध कुणीही मान्य करावा. ज्यांची मातृभाषा इंग्रजी नाही आणि जे परदेशात सेटल झालेले नाहीत अशा लोकांनी ह्या देशात राहून इंग्रजी भाषेत लेखन करणे हा शुद्ध गाढवपणा आहे. मात्र नेमाडे सरसकट सर्वच लेखनाला हा न्याय लागू करतात. मला मात्र केवळ ललित वाङ्मयालाच हे म्हणणे लागू करावेसे वाटते. कारण ललित वाङ्मयातील भाषा ही हवेत श्वासोच्छ्वास करण्याइतकी नैसर्गिकपणे आत येणे व बाहेर पडणे आवश्यक असते. शास्त्रीय वाङ्मयात मुळातच भाषा ही अधिक साधन असल्याने तिथे मात्र इंग्रजीत अभिव्यक्ती करायला

काहीच हरकत नाही. खुद्द नेमाडेंनी आपले वैचारिक लेखन इंग्रजीतही केलेले आहे हे इथे मुद्दाम नमूद करावेसे वाटते.

ललित वाङ्मयातील भाषेच्या प्रश्नाचे खरे गुंतागुंतीचे प्रश्न हे दुसऱ्या प्रकाराशी निगडित आहेत आणि येऊ घातलेल्या काळात हा प्रकार लोकसंख्येच्या दृष्टीने प्रचंड वाढत जाणार आहे. नेमाडेंनी ह्या वर्गाकडे पूर्ण दुर्लक्ष करून आपले विचार मांडले आहेत.

हा वर्ग जगात आज दोन पातळ्यांवर अस्तित्वात आहे.

**१) आंतरराष्ट्रीय पातळी** : यात आई व वडील दोघे दोन देशांतले असतात व त्यांच्यातले संभाषण इंग्रजीत चालल्याने अपत्याची भाषा इंग्रजी बनते.

**२) आंतरदेशीय पातळी** : यात एकाच देशातील दोन भिन्न भाषिक प्रांतांतील आईवडील असतात व त्यांच्यातील संपर्क-भाषा इंग्रजी असल्याने अपत्याची भाषा इंग्रजी असते.

ह्या दोन्ही पातळ्यांचा आपणाला गांभीर्याने विचार केल्याशिवाय इंग्रजीचे भारतातले स्थान निश्चित करता येणार नाही.

पहिल्या पातळीवरून निर्माण होणारा प्रश्न आहे, इंग्रजी ही नव्या ग्लोबलायझेशनच्या युगातील जगाची लिंग्वाफ्रँका बनणार आहे का ?

अलीक डेच फ्रान्समध्ये तिथल्या राज्यशासनाला शासकीय कारभारात इंग्रजी शब्द वापरल्यास शिक्षा देण्याची तरतूद असणारा कायदा करावा लागला. कारण फ्रान्समधल्या लोकांनी जवळजवळ ५ ते १०% शब्द इंग्रजी वापरायला सुरुवात केली. जो देश १९८५ पूर्वी अमेरिकेकडे संशयित नजरेने पहायचा, पॅरिससारख्या राजधानीत अमेरिकनांना स्पेशल ट्रीटमेंट नाकारायचा तोच देश आज इंग्रजीच्या संदर्भात बदलू लागलाय. हे परिवर्तन ग्लोबलायझेशनने घडवलेले आहे. ज्या रशिया, चीन व जपान यांची भाषिक उदाहरणे आपण आदर्श म्हणून डोळ्यासमोर ठेवायचो तेच देश आज इंग्रजी संभाषण शिकवणाऱ्या क्लासेसची संख्या झपाट्याने फुगवत चालले आहेत. अमेरिकन संस्कृतीचा प्रभाव सर्वच देशांतील नव्या युवा पिढीवर झपाट्याने वाढत चाललाय. पोशाखापासून नृत्यशैली व संगीतापर्यंत हा प्रभाव वाढतोच आहे. विसाव्या शतकातील सर्वश्रेष्ठ कला 'चित्रपट व टीव्हीपट' आज सर्वांत जास्त इंग्रजीतून वेगवेगळ्या देशांत वेगवेगळ्या चॅनेल्सच्याद्वारे अवतरत आहेत. ह्या सर्व पार्श्वभूमीवर इंग्रजीला अस्पृश्य मानून चालणार आहे का ?

कुठल्याही भाषेचा लिंग्वाफ्रँका म्हणून विचार करायचा असेल तर भाषा प्रथम मानवी

आयुष्यात काय काम करते ते पाहिले पाहिजे. सर्वसाधारणपणे भाषेबाबत एक मोठा गैरसमज बऱ्याच भाषा शास्त्रज्ञांनी व कलातज्ञांनी बाळगला आहे. तो म्हणजे भाषा जशी व्यवहारात वापरली जाते तसे शिल्पकलेचे पाषाण किंवा धातू, चित्रकलेचे रंग, संगीताचे ध्वनी व्यवहारात वापरले जात नाहीत. मर्ढेकरांनी तर ह्या गृहीताच्या आधारे त्यांच्या सौंदर्यमीमांसेत कवितेला दुय्यम स्थान दिले आहे. (पहा : आर्टस् अँड मॅन, पॉप्युलर बुक डेपो, पेज रोमनमधील ९ ते १०) भाषा ही व्यवहारात वापरली जात असल्याने, ती अर्थसापेक्ष असल्याने, ती इतर कलासंदर्भात दुय्यम ठरते असे त्यांना वाटते. नेमाडेंनीही 'साहित्याची भाषा' पान १० ते ११ वर म्हटले आहे :

*"इतर कलांची माध्यमे (शिल्पकलेचे पाषाण किंवा धातू, चित्रकलेचे रंग, संगीताचे ध्वनी) भाषेइतकी मानवी जीवनाची सर्वस्पर्शी भाग झालेली नसतात. की ती मानवी जीवन इतक्या विस्ताराने वा खोलीने व्यापणारी नसतात. शिवाय भाषेचे संदेशवहन आणि चिंतन म्हणून जसे महत्त्व आहे तसे पाषाण, धातू, रंग, ध्वनी यांचे स्वतंत्र महत्त्व मानवी जीवनात दाखवता येत नाही. पाषाणाचे खास मानवी जीवनाशी अतूट ठरलेले असे स्वतंत्र कार्य नाही. त्यामुळे शिल्प पाषाण : साहित्य : भाषा असे ठोकळेबाज समीकरण भाषेच्या बहुधर्मित्त्वामुळे शक्य होत नाही. संदेशवहन उत्तम करणे हे भाषेचे मूळ कार्य मानून मग साहित्यात भाषेचा वापर होतो तसे पाषाणाचे किंवा रंगाचे मूळ कार्य ठरवता येत नाही. त्यामुळे भावकवितेत भाषा हे माध्यम असते तर निबंधात ते प्रायः साधन असते. कादंबरीत ते कधी साधन म्हणून तर कधी माध्यम म्हणून येते. नाटकात ती मात्र साधन बनून येते. सारांश, साहित्यप्रकारानुसार भाषेचा वापर बदलत असतो."*

नेमाडेंचा वरील विचार मर्ढेकरांच्या भाषेत सांगायचा तर पाषाण किंवा रंग यांना मूळ कार्य नसल्याने ते अर्थनिरपेक्ष होतात म्हणूनच शुद्ध राहतात. म्हणूनच त्यांचा माध्यम म्हणून होणारा वापर हा अधिक शुद्ध असतो. मर्ढेकर या शुद्धतेला महत्त्व देऊन या माध्यम कलांना कवितेपेक्षा शुद्ध मानतात. तर नेमाडे ह्याउलट भाषेचे मूळ कार्य अधोरेखित करून ते माध्यम म्हणून अधिक व्यापक व सखोल मानतात. याचाच अर्थ असा की मर्ढेकर व नेमाडे या दोघांनाही भाषा ही माध्यम व साधन म्हणून काम करते व रंगद्रव्य, शिल्पद्रव्य साधन म्हणून जवळवजवळ काम करत नाहीत असे म्हणावयाचे आहे. प्रत्यक्ष वस्तुस्थिती नेमकी उलटी आहे.

खरेतर मानव जगताना अनेक साधने निर्माण करत असतो. बसण्यासाठी खुर्ची, झोपण्यासाठी अंथरूण, राहण्यासाठी घर वगैरे. ह्या सर्व वस्तू निर्माण होत असतानाच माणूस

त्यांना सौष्ठव देतो. या सौष्ठवाबरोबरच तो त्यांना रंग देतो आणि सर्वांत शेवटी त्या वस्तूला अर्थ देतो. त्याच्या भोवतालच्या सर्वच वस्तूंना सौष्ठव असते. आपसुख रंग असतोच. ह्या वस्तूंना क्रिया असते. त्यामागे ध्वनी असतो. काही क्रियांमागचा ध्वनी सूक्ष्म असतो. तो मानवालाही ऐकू येत नाही. काहींचा स्थूल असतो व तो मानवाला ऐकू येतो. ह्या सर्व वस्तूतून मानव स्वतः काही वस्तू निर्माण करतो उदा. खुर्ची, पंखा, रंग ह्या सर्वांना रंग, सौष्ठव, ध्वनी असतोच. याचाच अर्थ ज्याला चिन्हात्मक वापर म्हणता येईल तो रंगद्रव्य, धातूद्रव्य, पाषाणद्रव्य, ध्वनीद्रव्य यांचा होत असतोच. खुर्ची बनवतानाच तिचा आकार, रंग व ती ओढताना तिचा होणारा आवाज (एखाद्या खुर्चीचा फार आवाज होत असेल तर आपण ती नाकारतो) ह्या सर्व गोष्टी ध्यानात घेऊनच निर्मिती केली जाते. आपल्या रंगसंवेदना, सौष्ठवसंवेदना (मी इथे रंग केवळ स्पष्ट कळावे म्हणून वेगळे काढतोय. प्रत्यक्षात सौष्ठव आणि रंग वेगळे नसतात.) ध्वनिसंवेदना ह्या अतिशय जागृत असतात आणि आपण त्या अर्थसंवेदनाइतक्या साधन म्हणून वापरत असतो. सर्वच वस्तूंचे रंग व सौष्ठव आपण भोगत असतो. आपल्या प्रत्येक वस्तूच्या निवडीमागे आणि वस्तूंच्या मांडणीमागे ह्या संवेदना कार्यरत असतात.आपल्या ध्वनिसंवेदना तीव्र असतात म्हणूनच आपण केवळ ध्वनीसंवेदनेवरून व्यक्तींचे आवाज, प्राण्यांचे ध्वनी आणि वस्तूंचे ध्वनी ओळखत असतो. त्यांचे वर्गीकरण करत असतो. दुर्दैवाने आपणाला अर्थाची इतकी घाण सवय झालेली असते की जणू काय अर्थ म्हणजेच संवेदनांचे सर्वस्व आहे अशा थाटात आपण जगत असतो आणि ध्वनिचिन्हे, सौष्ठवचिन्हे, रंगचिन्हे, अभिनयचिन्हे ही सर्व आशयनिर्णयने आहेत आणि त्यांच्या साहाय्याने आपण शब्दापलीकडचे संदेशवहन सतत करत असतो हेच आपण विसरून जातो. खरे तर ध्वनि, सौष्ठव, रंग, अभिनय ह्या गोष्टी इतक्या साधन म्हणून वापरत असतो की उद्या जर त्या गायब झाल्या तर जगणे मुश्किल होऊन बसेल. नुसता अर्थ घेऊन तुम्ही काय करणार ? कपाळ ? खरेतर अर्थही ध्वनिमुळे वा सौष्ठवामुळे व्यक्त होतो. अर्थयुक्त ध्वनी किंवा सौष्ठव म्हणजेच भाषा असे म्हणता येईल. अन्यथा स्वर व व्यंजने म्हणजे पोकळ ध्वनी आहेत. हे ध्वनी अर्थशून्य असतात. मानव त्यात बौद्धार्थ किंवा मनार्थ भरतो. थोडक्यात, जिला आपण आज भाषा म्हणतो ती प्रत्यक्षात बौद्धार्थ किंवा मनार्थ असते. मानवासाठी प्रत्येक वस्तू सौष्ठव, रंग, ध्वनी यांच्याबरोबरच निर्णयनयुक्त असते. प्रत्येक वस्तूचे सौष्ठव, रंग, ध्वनी व निर्णयन हे सगळेच गुणधर्म महत्त्वाचे असतात. ह्यातील निर्णयन हा मानवाने दिलेला असतो म्हणून तो दुय्यम मानणे किंवा सर्वश्रेष्ठ मानणे ह्या दोन्हीही टोकाच्या भूमिका आहेत. मानव ह्या जगात अनेक वस्तू निर्माण

करतो तसेच निर्णयनही निर्माण करतो. अनेक गुंतागुंतीच्या वस्तू मानवाने नंतरच शोधल्या तसेच निर्णयन हीही अलीकडेच शोधलेली गोष्ट आहे. काही गोष्टी केवळ ध्वनीलाच शक्य असतात, काही केवळ सौष्ठवालाच शक्य असतात. तुम्ही सौष्ठव असेल तरच खुर्चीवर बसू शकता. किंवा कंठात आवाज आहे म्हणूनच मानव फोनवर ओळखू शकता. तसेच काही गोष्टी केवळ अर्थालाच शक्य असतात. ह्या अर्थचिन्हांचे एका विशिष्ट पद्धतीने दळणवळण असते. हे अर्थनिर्णयन महत्त्वाचे आहे. किंबहुना मानवाचे सर्व बुद्धिवैभव त्यात आहे हे खरे, पण अर्थनिर्णयन म्हणजे अंतिम सत्य नव्हे. अन्यथा निसर्ग काही अर्थनिर्णयन करत नाही. तो केवळ असतो. त्याला त्यामुळे मानवापेक्षा कनिष्ठ समजता येईल का ? मानवाचा अर्थ भाषाकेंद्री दृष्टिकोन हा मानवाला आज ह्या निर्णयाप्रत घेऊन आला आहे. आपण निसर्ग हवा तसा रुपांतरू शकतो. हा दृष्टिकोन मानवाला अर्थ भाषेमुळे शक्य झाला. पर्यावरणवाद्यांच्या लक्षात हा मुद्दा आलेला नाही म्हणूनच नेमाडेसुद्धा भाषाविज्ञान हे सर्वश्रेष्ठ शास्त्र आहे असे 'साहित्याची भाषा' या ग्रंथात पुनः पुन्हा सांगतात. वास्तविक हे भाषाविज्ञान जेव्हापासून जगातील मानव्यशाखांच्या इतिहासात केंद्रस्थानी आले आहे तेव्हापासून पर्यावरणाची नासाडी प्रचंड वाढलेली आहे. जर आपणाला पर्यावरणाचा खरोखरीच गांभीर्याने विचार करावयाचा असेल तर भाषाविज्ञान हे केंद्रस्थानावरून हटवून कलाविज्ञान आणले पाहिजे. ह्या कलाविज्ञानात अर्थ भाषा ही केंद्रस्थानावरून हटवून चित्रपट व टीव्ही हा केंद्रस्थानी आणला पाहिजे आणि अर्थाइतकेच वस्तूंचे सौष्ठव, रंग, संगीत ह्या चिन्हांना वजन देऊन मानवाची कलासंवेदना अर्थप्रधान ठेवण्याऐवजी ध्वनिसौष्ठव प्रधान केली पाहिजे. विज्ञान हे अर्थप्रधान राहिले तरी तिथेही ध्वनिसौष्ठवाचा वापर अधिक व्हायला हवा. अर्थाधीन राहण्यापेक्षा अर्थातित राहणे हे अधिक आनंददायी असते हे या जगाला सांगणे आवश्यक आहे. ध्यान हे विचारापेक्षा जोपर्यंत महत्त्वाचे ठरत नाही तोपर्यंत मानवजातीला भयापासून, दुःखापासून आणि यातनातून मुक्त होता येणार नाही. ध्यान म्हणजे अर्थातीत होणे हे इथे सांगायला नकोच. अर्थातीत होणे हाच निरर्थकतेवरचा उपाय आहे.

वरील सर्व विवेचन करण्याचे कारण नेमाडेंचा विचार हा भाषाविज्ञानाभोवती फिरतो आणि गेली ५० वर्षे भाषाविज्ञानाची एक वैचारिक दादागिरी संपूर्ण युरोपभर चालू आहे. तत्त्वज्ञानापासून समाजशास्त्रापर्यंत सर्वच मानव्यशाखांवर भाषाविज्ञानाची ही दादागिरी चालू असून तिने नकळतपणे मानवाला निसर्गापेक्षा श्रेष्ठ स्थान दिले आहे. कारण भाषा ही मानवनिर्मित आहे. त्याचे दुष्परिणाम युरोपियन, अमेरिकन लोकांना कळतील तेव्हा कळतील, पण आपण तरी

भारतात येऊ घातलेल्या तरुण पिढीने ही भाषाविज्ञानाची दादागिरी फेकून द्यायला हवी. नेमाडे ह्या दादागिरीला बळी पडले ह्यात नेमाडेंचा दोष नाही. कारण ह्या दादागिरीचा धोका जिथे युरोपियन लोकांना कळलेला नाही तिथे भारतातील लोकांना, जिथे अजून भाषाविज्ञान विकसितही झालेले नाही तिथे, तो कळेल असे वाटत नाही. याचा अर्थ भाषाविज्ञान नको असा नाही. फक्त भाषा म्हणजे सर्वस्व नव्हे हे ध्यानात घेऊन विचार व्हावा. युरोपियन लोकांना सर्वच अक्कल दिलेली नाही हे फक्त ध्यानात घ्यावे. अनुभव म्हणजे अर्थ नव्हे. अनुभवात प्रथम सौष्ठव, ध्वनी ह्या गोष्टी येतात आणि मग अर्थ येतो. निसर्गात प्रथम सौष्ठव व ध्वनी असतात व नंतर मानवी अर्थ येतो. सौष्ठवाचा सौष्ठव म्हणून, ध्वनीचा ध्वनी म्हणून अनुभव घेण्याला आपण आज पारखे झालो आहोत. त्याला कारण भाषेची, मानवावर चाललेली दादागिरी. ही दादागिरी संपवायची असेल तर विज्ञानाबरोबर ध्यानाची प्रतिष्ठापना होणे आवश्यक वाटते. आणि ध्यानाची पूर्वतयारी, कला चांगल्यारीतीने करून घेऊ शकते. किंबहुना विज्ञानातून तंत्रज्ञान जसे निर्माण होते तसेच ध्यानातून कला निर्माण होते. ह्या दोन्हींची मानवाला आज गरज आहे. भाषाविज्ञानाची, भाषेची व विचारांची मानवी जीवनावरील व मनावरील दादागिरी हा ह्यातील सर्वांत मोठा अडथळा आहे. (इथे ध्यानाचा अर्थ धर्म असा कुणी घेऊ नये. ध्यानाचा संबंध निर्विचार होण्याशी आहे. धर्म हा एक विचार असल्याने त्याचा ध्यानाशी काडीचाही संबंध उरलेला नाही.)

भाषाविज्ञान हे सर्वश्रेष्ठ मानव्यविज्ञान नसून तेही इतर मानव्यविज्ञानाप्रमाणे एक मानव्यविज्ञान आहे हे लक्षात घेल्यानंतर आपण भाषेचा अधिक स्वच्छपणे विचार करू शकतो. त्याचबरोबर कला म्हणजे काय ? हेही स्पष्टपणे पाहू शकतो.

भाषेप्रमाणेच ध्वनीनिर्णयन व सौष्ठवनिर्णयनही व्यवहारात तितकेच प्रचलित असते. किंबहुना भाषेपेक्षा जास्त प्रचलित असते. हे लक्षात घेतले की मर्ढेकरांचा, भाषा व्यवहारिक साधन असते म्हणून भाषिक कलांना दुय्यम ठरविण्याचा प्रयत्न किती फोल आहे हे सहज लक्षात येईल. प्रत्यक्ष जगताना ध्वनीसौष्ठावचिन्हांची आपणाला इतकी सवय झालेली असते की चित्रकला किंवा शिल्पकला ह्यातील सौष्ठव आस्वादताना अनेकदा ही सवय आड येते. केवळ शब्दच वापरून वापरून गुळगुळीत व शिळे झालेले नसतात तर वस्तूंची सौष्ठवचिन्हे (ह्यात रंगही येतात) व ध्वनीचिन्हेही वापरून वापरून शिळी व गुळगुळीत झालेली असतात. किंबहुना शब्दापेक्षा सौष्ठव अधिक सवयीचे असते. त्यामुळे मर्ढेकरांची कसोटी लावायची ठरवली तर सौष्ठवकला अधिक दुय्यम होतील.(माणूस प्रथम डोळे उघडतो, प्राणी डोळे उघडू शकत नाही हे एक जीवशास्त्रीय

सत्य आहे) तसेच नेमाडे म्हणतात त्याप्रमाणे भाषेला अधिक खोली वगैरे काही नसते. सौष्ठव व ध्वनी हेही व्यवहारिकही असतात. भाषेचे नेमाडेंनी (१) व्यवहारभाषा (२) शास्त्रभाषा (३) साहित्यभाषा असे स्तर कल्पलेत. सौष्ठव व ध्वनीलाही हे तीन स्तर आहेत. (१) व्यवहारिक सौष्ठव व ध्वनी (२) शास्त्रीय सौष्ठव व ध्वनी (गणित व भूमिती तर पूर्णपणे ह्यावरच उभी आहेत). आधुनिक काळात शास्त्र भाषेने शिकवण्याबरोबरच चित्रपट व टीव्हीपट यांच्या साहाय्याने शिकवणे हे अधिक फलदायी मानतात. प्रयोगशाळेतील शास्त्रीय प्रयोग तर सौष्ठव व ध्वनिप्रधानच असतात. केमिकल्स कशी ओळखायची किंवा निळा लिटमस तांबडा होणे वगैरे गोष्टी सौष्ठवावरच अवलंबून असतात. भौतिकशास्त्रात ध्वनी महत्त्वाचा असतो. (३) कलासौष्ठव (ह्यात शिल्प, चित्र, फिल्म, नाटक, नृत्य वगैरे कला येतात.) व कलाध्वनी (ह्यात संगीत येते). सांगण्याचा मुद्दा इतकाच की, नेमाडेंनी मानवी जीवनात भाषेला दिलेले केंद्रीयस्थान चुकीचे वाटते. साहित्य हे जसे व्यवहारिक भाषेची उन्निर्मिती (हा शब्द मी प्रभाकर पाध्येंच्या 'सौंदर्यानुभव' ह्या ग्रंथातला वापरतोय) आहे. तसेच शिल्पचित्र ह्या कला व्यावहारिक सौष्ठवचिन्हाची फिल्म, नाटक ह्या कला व्यावहारिक घटनाचिन्हाची नृत्य, अभिनय ह्या कला व्यावहारिक देहमुद्रांची उन्निर्मिती आहे. साहित्यात जसे काव्य आणि गद्य असे दोन प्रकार होतात तसेच शिल्पकलेत शिल्प व पुतळा, चित्रकलेत पेंटिंग व कमर्शिअल डिझाईन व फोटोग्राफी, देहकलात नृत्य व अभिनय, फिल्ममध्ये चित्रपट व डॉक्युमेंटरी असे दोन प्रकार होतात. पु. शि. रेगेंनी पॉल व्हॅलरीचे कोटेशन छांदसीमध्ये दिले होते. त्यांच्या मते गद्य म्हणजे चालणे आणि काव्य म्हणजे नृत्य करणे होय. प्रत्यक्षात हे मत अत्यंत चुकीचे आहे. ते दुरुस्त करून मी म्हणेन की गद्य म्हणजे अभिनय व काव्य म्हणजे नृत्य होय. चालणे हे व्यावहारिक आहे. अभिनय हे उन्नयन आहे. नेमाडे म्हणतात तसे गद्य हे व्यावहारिक भाषेने युक्त असते हे वरकरणी सत्य वाटले तरी प्रत्यक्षात अभिनय जसा नेहमीच्या चालण्या-बोलण्याचे, वागण्याचे उन्नयन होऊन जन्मतो तसेच गद्यही व्यावहारिक भाषेचे उन्नयन होऊन जन्मते. देह एरवीही व्यवहारात संदेशवहन करत असतोच तसेच भाषाही संदेशवहन करत असते. दोन्हींचेही कलेत उन्नयन होते. हे उन्नयन जेव्हा त्या त्या कलेतील माध्यमाचे व्याकरण मोडीत काढते तेव्हा माध्यम आणि आशय यांच्यात पूर्ण अद्वैत होते आणि अशा अद्वैती कला त्या त्या कला प्रकारात तीव्र वाटतात. ह्या न्यायानेच नृत्य अभिनयापेक्षा, पेंटिंग कमर्शिअल पेंटिंगपेक्षा, शिल्प पुतळ्यापेक्षा, चित्रपट डॉक्युमेंटरीपेक्षा, शास्त्रीय संगीत भावगीतापेक्षा, बॅले नाटकापेक्षा आणि काव्य गद्यापेक्षा तीव्र वाटते. ह्या सर्व अद्वैती कला भाषेचे, सौष्ठवाचे, स्वरांचे, घटनांचे व्याकरण हवे तसे मोडतात, वाकवतात. आपण ह्यानुसार कलांचे खालीलप्रमाणे वर्गीकरण करू शकतो.

| कलाप्रकार | अद्वैती | युग्म | विशिष्टाद्वैती | द्वैती |
|---|---|---|---|---|
| साहित्य | काव्य | कादंबरी<br>कथा<br>लघुनिबंध | नाटकाची<br>शब्दसंहिता | निबंध<br>चरित्र |
| चित्र<br>(द्विमिती सौष्ठव) | पेंटिंग | कमर्शिअल<br>पेंटिंग वा<br>फोटोग्राफी | विणकाम<br>भरतकाम | कमर्शिअल<br>फोटोग्राफी |
| शिल्प<br>(त्रिमिती सौष्ठव) | शिल्प | आर्किटेक्चर<br>पुतळा | नेपथ्य<br>सेट | कमर्शिअल<br>आर्किटेक्चर |
| संगीत | वाद्यसंगीत<br>शब्दशून्य<br>कंठसंगीत | कंठसंगीत<br>(शास्त्रीय) | शब्दप्रधान<br>गायकी | पार्श्वसंगीत |
| अभिनय | नृत्य | मुकाभिनय | नाट्याभिनय | चित्रपटाभिनय |
| घटनाकला<br>(चित्रपट, नाटक<br>वगैरे) | घटनापट<br>(घटनापटालाच<br>चित्रपट म्हणता<br>येईल) | नृत्य व नाटक | जाहिरातपट,<br>पथनाट्य | वृत्तपट,<br>माहितीपट |

अद्वैती कलात उन्नयन सर्वाधिक असते. ते युग्मीय, विशिष्टाद्वैती आणि द्वैती असे ओसरत जाते. भाषेचे सर्वाधिक उन्नयन काव्यात असते. किंबहुना कविता म्हणजे भाषेने घेतलेली झेप असते. त्याखालोखाल कादंबरी, कथा, लघुनिबंध. त्याखालोखाल नाटकात (म्हणजे नाटकाच्या शब्दसंहितेत) आणि निबंध व चरित्रात हे उन्नयन सर्वात कमी असते. थोडक्यात, कुठलीही कला ही मानवी जीवनातील ध्वनी, सौष्ठव, देहसौष्ठव, घटना आणि अर्थ यांचे चिन्हीय उन्नयन असते. मानव जशी खुर्ची, टेपरेकॉर्डर ह्या वस्तू निर्माण करतो तसा अर्थ निर्माण करतो. मानवाची लिपी ही तर सौष्ठवचिन्हच असते आणि त्यातून अर्थ निर्माण होतो. किंवा शब्दोच्चार हे ध्वनीचिन्हच असते आणि त्यातूनही अर्थ निर्माण होतो. तेव्हा अर्थालाही ध्वनी आणि सौष्ठव यापासून पळून जाता येत नाही. मात्र भाषेत अर्थ महत्त्वाचा असतो. जोपर्यंत ध्वनींचा समूह किंवा सौष्ठवांचा

समूह आशय निर्माण करत नाही तोपर्यंत त्याला आपण भाषा म्हणत नाही. ( व्याकरणाच्या भाषेत वाक्य म्हणत नाही.) आपल्याकडे अर्थाची इतकी वाईट सवय झाली आहे की, लोक चित्रकलेत, शिल्पकलेत, संगीतातही अर्थ शोधत बसतात. वास्तविक हा शुद्ध गाढवपणा आहे. संगीत हा ध्वनीचिन्हांचा अनुभव असतो. चित्रशिल्प हा सौष्ठवचिन्हांचा अनुभव असतो. अभिनय हा देहसौष्ठवचिन्हांचा अनुभव असतो. घटनाकला हा घटनाचिन्हांचा अनुभव असतो. यातील घटनाकलांना मी संमिश्र कला म्हणतो तर संगीत, शिल्प, चित्र, साहित्य, अभिनय (नृत्य व मुकाभिनय) या शुद्ध कला आहेत. कारण त्या एकेंद्रिय कला आहेत. तर नृत्य, नाटक, घटनापट ह्या बहुइंद्रिय कला आहेत. ह्यातील घटनापट हा ऐंद्रिय अनुभवांचा सर्वात व्यापक विस्तार असल्याने तो अनुभव पातळीवर सर्व व्यापक कला होय. त्याखालोखाल नाटक, नृत्य ह्यांचा क्रमांक लागेल. मात्र ध्यानाच्या पातळीवर संगीत, चित्र, शिल्प ह्या सूक्ष्म कला आहेत. कारण त्या निर्विचार व्हायला जास्त मदत करतात. साहित्य ही अर्थनिर्णयन पातळीवर व्यापक आहे. माझ्या दृष्टिकोनातून कलांचे सर्वश्रेष्ठ प्रयोजन मोक्ष किंवा निर्वाण किंवा कैवल्यप्राप्ती हेच होय. त्यासाठी चित्रपट, नाटक, नृत्य, साहित्य ह्यांनी आपला अनुभव अधिकाधिक व्यापक व सूक्ष्म करायला हवा. मानवी अनुभवविश्वाचा सतत विस्तार हे त्यांचे उद्दिष्ट असले पाहिजे, तर संगीत, चित्र, शिल्प ह्या कलांनी अधिकाधिक शुद्ध होण्याचा प्रयत्न करायला हवा. जो संगीतकार मला अजून शुद्ध धैवत किंवा शुद्ध पंचम वगैरे सापडलेला नाही म्हणतो व असे शुद्ध स्वर शोधत जातो त्यासाठी रियाज करून करून सूर, श्रुती सतत तासत जातो तोच खरा संगीतकार होय. हीच गोष्ट चित्रशिल्याबाबत ! जगातील सौष्ठवांची शुद्ध मांडणी शोधण्याचा सततचा ध्यास चित्रकार व शिल्पकारांना असला पाहिजे. साहित्यकाराने सतत मानवी मन व बुद्धी ह्यांनी वस्तूंच्या लावलेल्या अर्थांचे सूक्ष्म व स्थूल, व्यापक व खोल असे अर्थ शोधत गेले पाहिजे. विज्ञान हा शोध निर्भाव होऊन घेते. वस्तूंच्या अर्थाचे निर्भावात्मक (त्यामुळेच व्यक्तिनिरपेक्ष) निर्णय हा विज्ञानाचा महत्त्वाचा भाग. त्यानंतर विज्ञान त्या वस्तूंचे सौष्ठव व ध्वनीरूप हवे तसे रूपांतरित करणे ह्या तंत्रज्ञानात्मक भागाकडे वळते. साहित्य वस्तूंच्या अर्थाचे सभावात्मक निर्णयन करते. या दोन्ही प्रकारचे अर्थनिर्णयन हेच भाषेचे कार्य होय. व्यवहारात हे अर्थनिर्णयन सतत चाललेले असते. ह्यातून भाषा (१) शास्त्रीय व व्यक्तिगत ज्ञानाची देवाणघेवाण, (२) व्यक्तिगत अनुभवांची देवाणघेवाण अशी दोन्ही कार्ये पार पाडत असते. भूतकालीन ज्ञानाचे व अनुभवांचे संचित वर्तमानकालीन ज्ञान व अनुभव आणि भविष्यकालीन ज्ञानाच्या व अनुभवांच्या संभाव्यता ह्या तीन पातळ्यांवर भाषेचा हा व्यवहार चालतो. भाषेत अनुभव हा अर्थातच अर्थयुक्त असतो हे

ध्यानात घेतले पाहिजे. चित्रातला रंग हा प्रत्यक्ष अर्थातीत असतो. भाषेत जेव्हा पिवळा हा शब्द येतो तेव्हा पिवळ्या रंगाचा तो अनुभव नसतो तर पिवळ्या रंगाचे ते अर्थनिर्णयन असते. थोडक्यात, अनुभवातला पिवळा रंग चित्रकलेत भावनिर्णयन ठरतो, तर भाषेत तो अर्थनिर्णयन आणि भावनिर्णयन यांनी युक्त असतो. भाषेची व्यवहारिक पातळी ही बहुधा वर्तमानकालीन प्रत्यक्ष घटना असते, तर साहित्यात किंवा वर्तमानपत्रासारख्या भाषिक साधनात भाषेची पातळी ही बहुधा भूतकालीन किंवा भविष्यकालीन असते. काव्यातील वर्तमान हा कधीच प्रत्यक्ष नसतो. तो अनुमानात्मक वर्तमान असतो. मी जातो. आम्ही करतो. ही विधाने प्रत्यक्ष वर्तमानकाळ नसून तो वर्तमानाविषयी काढलेला निष्कर्ष असतो आणि काव्यात वर्तमानाची ही निष्कर्षात्मक अवस्था फारच टोकाची असते.

वरील सर्व विवेचनावरून कुणाला कदाचित असाही आक्षेप घेता येईल की, वस्तू आधी अस्तित्वात असतात आणि अर्थ हा नंतर येतो, तो काहीसा उपरा असतो त्यामुळे सौष्ठव व ध्वनी निर्णयन ह्या गोष्टी अधिक महत्त्वाच्या आहेत असे विधान करता येणार नाही असे माझे मत आहे. कारण सौष्ठव व ध्वनी ह्या स्वतंत्रपणे अस्तित्वात असतात हे खरे असले तरी मानवापुरते त्यांचे अस्तित्व हे मानवामुळे शक्य होते. सौष्ठवाचे व ध्वनीचे जे रूप मानव भोगतो तेही मानवनिर्मितच असते. ह्याला मी ध्वनिनिर्णयन व सौष्ठवनिर्णयन असे म्हटले आहे. माणूस जसे अर्थनिर्णयन करीत असतो तसेच ध्वनीनिर्णयन व सौष्ठवनिर्णयनही करीत असतो. आणि प्रत्येक माणसागणिक ध्वनिनिर्णयन व सौष्ठवनिर्णयन बदलत असते. त्यामुळेच ज्या वस्तू मला आवडतील त्या दुसऱ्याला आवडतीलच असे नाही. त्यामुळेच एका चित्राविषयी, शिल्पाविषयी किंवा बंदिशीविषयी वेगवेगळ्या व्यक्तींचे वेगवेगळे सौष्ठवनिर्णयन वा ध्वनिनिर्णयन होत असते. कारण प्रत्येकाचे संस्कारण (कंडिशनिंग) वेगवेगळे असते. त्यामुळे साहजिकच प्रत्येकाचे ध्वनिसंस्कारण किंवा सौष्ठवसंस्कारण वेगवेगळे असते. तेव्हा वस्तू आधी आस्तित्वात असते आणि ध्वनी, निर्णयन सौष्ठव निर्णयन अर्थ निर्णयन ह्या गोष्टी नंतरच येंत असतात. आता एक गोष्ट मात्र खरी की माणूस प्रथम सौष्ठवभाषा, ध्वनीभाषा शिकतो आणि मगच अर्थभाषा शिकतो. प्रथम माणसावर सौष्ठवसंस्कारण, ध्वनिसंस्कारण होते आणि मगच अर्थसंस्कारण होते. मग याचा अर्थ सौष्ठवभाषा किंवा ध्वनीभाषा अर्थभाषेपेक्षा श्रेष्ठ म्हणता येईल का ? तर त्याचेही उत्तर नाही असे आहे. कारण मानवाचे जे काही मानव म्हणून वैभव आहे ते अर्थभाषेमुळेच शक्य आहे. वस्तूच्यानंतर प्रथम सौष्ठवभाषा व ध्वनिभाषा हे खरे असले तरी आणि त्यानंतरच अर्थभाषा अस्तित्वात येते हे खरे असले तरी सौष्ठवभाषेनंतर व ध्वनिभाषेनंतर फारशा वस्तू अस्तित्वात येत नाहीत. (प्राण्यांकडे

सौष्ठवभाषा व ध्वनिभाषा असली तरी त्यातून मानवाप्रमाणे नवीन वस्तू निर्माण करणे त्यांना मानवाइतके साधत नाही.) याउलट मानवाने अर्थभाषा निर्माण करून निसर्गाचा क्रम पूर्ण उलटा केला. वस्तू → सौष्ठवभाषा → ध्वनिभाषा → अर्थभाषा ह्या क्रमानंतर मानवाने अर्थभाषा → ध्वनिसौष्ठवभाषा → वस्तूंची निर्मिती असा क्रम निर्माण केला. त्यामुळे आज इमारती कारखान्यांपासून सुईपर्यंत अनेक मानवनिर्मित वस्तूंनी हे जग व्याप्त झाले आहे. वैश्य व दलीत जाणिवेने हा क्रम उलटा करण्याबाबत प्रचंड वेग गाठला आणि म्हणूनच भाषाविज्ञान आणि चिन्हविज्ञान हळूहळू केंद्रस्थानी आले. व्हिटगेस्टाईनचा - अर्थभाषेत जेवढे व्यक्त होते तेवढेच सत्य माना - हा आग्रह वैश्य जाणिवेचा एक उच्च बिंदू आहे. ब्राह्मण जाणिवेत व क्षत्रिय जाणिवेत ध्वनिसौष्ठव भाषेचे महत्त्व ढळले नव्हते. वैश्य जाणिवेत ते ढळले आणि तत्त्वज्ञान म्हणजे भाषाविज्ञानाची एक शाखा बनविण्याचे प्रयत्न झाले. अस्तित्ववादाने व त्यानंतर आलेल्या विसाव्या शतकातील अनेक चित्रकार, शिल्पकार ह्यांच्या फौजांनी विसाव्या शतकात ह्याला शह म्हणून अस्तित्वाच्या ध्वनिसौष्ठवात्मक रूपाला अर्थरूपापेक्षा महत्त्व दिले. फक्त अस्तित्ववाद्यांना आपण काय करतोय हे स्पष्टपणे लक्षात आले नाही. त्यामुळे त्यांनी भाषाविज्ञानाविरुद्ध दंड थोपटले नाहीत. खरेतर अस्तित्वाचे सारतत्त्व म्हणजे दुसरे-तिसरे काही नसून अस्तित्वाचे अर्थापूर्वीचे रूप होय. ते महत्त्वाचे आहे हे सांगणे हाच अस्तित्ववादाचा प्रयत्न होता; पण अस्तित्ववाद्यांना तशी मांडणी करता आली नाही. थोडक्यात सांगण्याचा मुद्दा इतकाच की, मानवासंदर्भात ध्वनिभाषा, सौष्ठवभाषा व अर्थभाषा या सारख्याच महत्त्वाच्या आहेत. आधुनिक तत्त्वज्ञानाचा अर्थभाषा महत्त्वाचा ठरवण्याचा प्रयत्न अत्यंत चुकीचा आहे. अर्थभाषेने मानवाला ताकद दिली असली तरी ध्वनिभाषा व सौष्ठवभाषा ह्याच त्यामागच्या आधारशीला आहेत हे लक्षात घेतले पाहिजे. शेवटी मानवाने निर्माण केलेली प्रत्येक वस्तू ही निसर्गाच्याच एखाद्या अंशाचे रूपांतर आहे. हे रूपांतर अनेकदा निसर्गापेक्षा प्रभावी असते हे खरे असले तरी त्याचा मूळ आधार निसर्गच असतो हे आपण लक्षात घेतले पाहिजे. अर्थभााषा हे असेच ध्वनिसौष्ठव भाषेचे रूपांतर आहे आणि ही ध्वनिसौष्ठवभाषा केवळ निसर्गातील ध्वनिसौष्ठवामुळेच शक्य झाली आहे.

मी भाषेविषयीचा (भाषा हा शब्द मी ह्यापुढे अर्थभाषेचे संक्षिप्त रूप म्हणून वापरत आहे.) ध्वनिभाषा व सौष्ठवभाषा या संदर्भात सर्वांगीण विचार करण्याचे एकमेव कारण म्हणजे इंग्रजी किंवा मराठी भाषेचा विचार करताना केवळ साहित्याचा विचार करून चालणार नाही, तर सर्वच दृक्कलांचा विचार करावा लागेल. मर्ढेकरांच्या सौंदर्यमीमांसेला शह देण्यासाठी नेमाडे

प्रभृतींनी वैश्य जाणिवेतील आधुनिकतेने जे विशेषीकरणाला महत्त्व दिले तिचा कलेच्या समीक्षेत हिरिरीने पुरस्कार केला. त्याचे काही फायदेही झाले आणि आहेत. त्यानुसार नेमाडेंनी आपला विचार साहित्यासंदर्भात तर अशोक रानडेंनी आपला विचार संगीतासंदर्भात मांडायचा अशी एक नवीन रूढी निर्माण करण्याचा प्रयत्न केला गेला. अलीकडे हा विशेषीकरणावरचा भर ओसरला आहे. प्रत्येक कलेचे प्रश्न स्वतंत्र असतात असा ह्या विशेषीकरणामागे दृष्टिकोन होता. मला वाटते, भारतासारख्या अवकाशात हा विचार परवडणारा नाही. जिथे अजून आपल्या शिक्षणात इंग्रजीचे स्थान काय ? हा प्रश्नही धड सुटलेला नाही तिथे विशेषीकरणाची चैन परवडणार नाही. सध्यातरी विशेषीकरण व एकात्मीकरण ह्या दोन्ही प्रक्रिया सतत एकत्र चालायला हव्यात. पाश्चात्त्य संस्कृतीला मध्यंतरी ही विशेषीकरणाची बाधा जरा जादाच झाली होती; पण त्यांनाही आता एकात्मीकरणाची गरज पटते आहे. नेमाडेंच्या भाषाविचारालाही हे विशेषीकरण चावल्यामुळे (त्यांचा देशीवाद त्यांना इथे संरक्षण देऊ शकलेला नाही हे लक्षात घेण्याजोगे आहे) त्यांचा भाषाविषयक दृष्टिकोन कमालीचा साहित्यकेंद्री झाला आहे. नेमाडेंचे हे विचार वाचून लोक जणूकाय कथा-कादंबऱ्या-कविता लिहिण्यासाठीच भाषा शिकतात की काय ? असा प्रश्न पडतो. नेमाडेंचा हा साहित्यकेंद्री दृष्टिकोनच त्यांना इंग्रजीचा कमालीचा द्वेष करायला प्रवृत्त करतो. किंबहुना साहित्यकेंद्री दृष्टीकोन हा नेमाडेंच्या भाषाविषयक विचारातला एक मोठा दोष होय. आपणास मात्र इंग्रजीचा विचार करताना हा साहित्यकेंद्री दृष्टिकोन स्वीकारता येणार नाही. भाषेचे कार्य आपण पाहिले. त्यावरून भाषा चार स्तरांवर काम करताना आपणास दिसेल-

१) **शास्त्रीय ज्ञानाचे वहन करताना** : हे वहन प्रामुख्याने ग्रंथांतून होते. ह्याशिवाय वर्तमानपत्रे, नियतकालिके, व्याख्याने, चर्चा व प्रत्यक्ष बोलण्यातून होतेच. ह्याशिवाय टीव्ही आणि घटनापट यांतूनही होते.

२) **वर्तमानकालिन घडामोडींचे वहन करताना** : हे वहन प्रामुख्याने वर्तमानपत्रांतून होते; त्याशिवाय ग्रंथ, नियतकालिके, व्याख्याने, चर्चा व प्रत्यक्ष बोलण्यातून होतेच. तसेच टीव्ही आणि घटनापट यांतूनही होते.

३) **सभावात्मक अनुभवाचे व ज्ञानाचे वहन** : हे वहन प्रामुख्याने वाङ्मयातून होते. त्याशिवाय ग्रंथ, नियतकालिके, व्याख्याने, चर्चा व प्रत्यक्ष बोलण्यातून होतेच. तसेच टीव्ही आणि घटनापट यांतूनही होते. ह्याशिवाय काही वेळा इतर कलांतूनही होते.

जर आपणाला इंग्रजी भाषेसंदर्भात धोरण ठरवायचे असेल तर ह्या सर्वच स्तरांचा विचार

करून ते ठरवावे लागेल. त्यासाठी आपणाला आजचा शैक्षणिक आकृतिबंध पूर्णपणे बदलायला हवा. आज विज्ञान, वाणिज्य आणि कला अशा तीन शाखा आहेत. ह्यातील कला शाखेत इतिहास, समाजशास्त्र, राज्यशास्त्र वगैरे मानव्यविज्ञानांचा समावेश केलेला दिसतो व अर्थशास्त्रप्रधान विषय वाणिज्य शाखेत ठेवलेत. ह्यातून काही भलतेच अनर्थ निर्माण झालेत. आज भारतातल्या बहुसंख्य वाणिज्य विद्यार्थ्यांना ज्या समाजासाठी आपण अर्थव्यवस्था राबवतो त्या समाजातील चलनवलनाचा पत्ता नाही, तर इतिहास वगैरे विषय कला शाखेत समाविष्ट केल्याने हे विषय कला आहेत की काय ? असा संभ्रम निर्माण होतो. त्याचबरोबर सर्वसाधारणपणे कला शाखा ही दुय्यम मानल्याने अनेकदा समाजशास्त्र, मानव्यशास्त्र ह्यांसारख्या महत्त्वाच्या विषयांत बुद्धिमान माणसेच आढळत नाहीत. कारण सर्वांत कमी टक्क्याने गाळातले विद्यार्थी कलाशाखेकडे येतात. परिणामी भारतात सामाजिक नियोजनाबाबत बुद्धिमान वर्ग निष्क्रिय बनलेला दिसतो. अनेकदा युनियन पब्लिक सर्व्हिस कमिशन व महाराष्ट्र पब्लिक सर्व्हिस कमिशनमधून शासनाला मिळणारा अधिकारीवर्ग हा कला शाखेतून उपलब्ध झाल्याने शासनव्यवस्थेत वैज्ञानिक जाणीव नसलेल्या निर्बुद्ध अधिकाऱ्यांची एक फौजच मिळते. (माझा स्वतःचा अनुभव असा की, कला शाखातले अधिकारी हे अनेकदा निष्क्रिय, प्रतिभाशून्य पण सामान्य माणसाविषयी व समाजाविषयी अधिक आस्था बाळगणारे असतात, तर विज्ञान शाखातले शासकीय अधिकारी समाजाविषयी आस्था नसणारे पण प्रतिभावान असतात. दुर्दैवाने ह्यांची प्रतिभा अनेकदा पैसे खाण्याचे नवे मार्ग शोधण्यातच जाते. वाणिज्य शाखेतून आलेला अधिकारी हा थोडेसे सामाजिक भानही बाळगतो आणि पैसेही खातो.) त्यामुळे आपले सामाजिक आर्थिक नियोजन हे दुसऱ्यांचे मॉडेल मिरवणारे, पाट्या टाकणारे होते. कला शाखेतील विद्यार्थीवर्ग हा कलेबाबत सर्वांत जास्त निर्बुद्ध आढळतो. त्यांना वाङ्मय सोडले तर इतर कलांची साधी आवडही नसते. एकीकडे मेडिकल कॉलेजचे विद्यार्थी (बहुतेक सर्व मेडिकल कॉलेजची मॅगेझीन्स आणि कला महाविद्यालयाची मॅगेझीन्स ह्यांची तुलना करून पाहावी. मेडिकलचा दर्जा दुप्पट चांगला असतो. आज मेडिकल इंजिनिअरिंगचे लोकं गॅदरिंग धुमधडाक्याने करतात तर कला महाविद्यालयात साध्या एकांकिकांबाबत प्रचंड घोळ चाललेले असतात. मुंबई अपवाद) तर दुसरीकडे नुस्ती गाईडं वाचून पास होणारे कलांचे विद्यार्थी ज्यांना कला कशाशी खातात हे तीन वर्ष अभ्यास करूनही कळत नाही. ह्या सर्वांचा वाङ्मयाशी संबंध येतो तो केवळ सक्ती आहे म्हणून. त्यातच आपल्या मराठी भाषेचा अभ्यासक्रम इतका विनोदी आहे की त्यातून फक्त अर्धवट समीक्षकांची मच्छराप्रमाणे पैदास होते. वाङ्मय विषय घेऊन कलावंत झालेला विद्यार्थी माझ्या पाहण्यात नाही. बहुतेक कलावंत हे स्वतःमुळेच

कलावंत व लेखक होतात. कलाशाखा म्हणवून घेणाऱ्या शाखेत एकही कला, कला म्हणून शिकवली जात नाही हा विनोद नव्हे काय ? विज्ञानशाखेत शिकणाऱ्या लोकांना कलांची कसलीही आवश्यकता नसते असा आपला अभ्यासक्रम आखणाऱ्यांचा गैरसमज आहे की काय समजत नाही. जणू डॉक्टर, इंजिनिअर व तंत्रज्ञांना एकतर साहित्य, चित्रपट, संगीताची आवश्यकता नाही किंवा हे लोक अतिबुद्धिमान असल्याने त्यांना त्या आपोआप कळतात. आपल्या सर्व शिक्षणव्यवस्थेत साहित्य वगळता इतर कलांचा संबंध विद्यार्थ्यांपासून ज्या पातळीवर तोडलाय तो बघता ह्या देशाला फक्त वाङ्मयाची गरज आहे, इतर कलांची नाही असाच समज व्हावा. एकीकडे कलेबाबत ही स्थिती तर दुसरीकडे कला व वाणिज्य शाखेतल्या विद्यार्थ्यांना विज्ञानातले ओ की ठो कळत नाही. हा सर्व गोंधळ निस्तारायचा असेल तर आपणाला ह्या शाखा बदलायला हव्यात. विज्ञान शाखेत फक्त शास्त्रेच शिकविली जावीत. वाणिज्य व कला शाखा एकत्र करून त्यांची मानव्य शाखा तयार करावी आणि साहित्य ही कला व इतर कला वेगळ्या काढून स्वतंत्र कला महाविद्यालये उभी करून त्यात शिकवल्या जाव्यात. अशा तीन शाखा वेगळ्या केल्या की मग इंग्रजीविषयी तीन शाखांसंदर्भात नीट निर्णय घेता येईल. मात्र इंग्रजी किंवा मराठीचा माध्यम म्हणून वेगळा विचार करण्यापेक्षा सर्व शिक्षणपद्धतीत मुळातच जे बदल करणे आवश्यक आहेत ते मी प्रथम सुचवणार आहे. नेमाडेंनी शिक्षणाचा विचार फारसा केलेला नाही; पण नेमाडे ज्या पद्धतीचे परिवर्तन अपेक्षित धरतात ते शिक्षणाबाबत मूलभूत बदल केल्याशिवाय शक्य होणार नाही. त्यामुळेच मी भारतीय शिक्षणपद्धतीतच काही मूलभूत बदल सुचवणार आहे. प्रथम आपण कलांचा विचार करणार आहोत. नंतर विज्ञानाचा आणि शेवटी मानव्यविद्येचा. कलाशिक्षणाचा विचार करतानाच शिक्षणाविषयी ज्या मूलभूत गोष्टी तिन्हींना समान आहेत त्यांची चर्चा होईल.

माझ्या मते,
To raise the question is a philosophy.
To answer the question is a science.
To intercourse with all questions & answers
containing total being is an art
&
To create doubt & power to say 'no'
Flowering whole yesness in existence is an education.

कलाशिक्षणाचा विचार करताना मला जाणवलेली पहिली गोष्ट म्हणजे कला महाविद्यालये पूर्णपणे स्वतंत्र असायला हवीत आणि त्यांच्यात केवळ कलांचे शिक्षण द्यायला हवे. कला

महाविद्यालयातून बॅचलर ऑफ आर्टस् किंवा मास्टर ऑफ आर्टस् ह्या पदव्या दिल्या जाव्यात आणि त्यांचा विषय सिनेमा, नाटक, चित्र, शिल्प, साहित्य, फोटोग्राफी, नृत्य, स्थापत्य वगैरे हवा. इतिहास वगैरे विषय मानव्य शाखेशी जोडले जावेत. प्रत्यक्षात आज ते कला शाखेशी जोडले गेलेत आणि साहित्य हेही कला शाखेशीच जोडले गेल्याने आज साहित्याची सर्वात अधिक गोची झालीये. साहित्य ही स्वतंत्र कला आहे आणि तिची नाळ मानव्य विज्ञानांशी जोडण्याऐवजी कलांशी जोडली गेली पाहिजे. ह्या कलासंकुलात (कला महाविद्यालयाला कलासंकुल हाही शब्द सुचवता येईल. तोच अधिक योग्य असल्याने इथे वापरत आहे.) प्रथमवर्षी चार कला असाव्यात. ह्यातील दोन कला प्रत्यक्ष शिकाव्यात तर उरलेल्या दोनांत किमान आस्वादक म्हणून तयारी करून घ्यावी. ह्याच वर्षी पाचवा विषय हा सांस्कृतिक शास्त्र असावा आणि त्यात सर्व मानव्य शाखांचा परिचय असावा. द्वितीय वर्षी चाराऐवजी विद्यार्थ्याला त्याला आवडतील अशा दोन कलांचे चार पेपर्स असावेत. त्यात दोन कलांची अधिक खोल ओळख असावी. दुसऱ्या वर्षी सांस्कृतिक शास्त्रांचा सखोल परिचय तर विज्ञानाचा त्रोटक परिचय असावा. तिसऱ्या वर्षी एकाच कलेचे चार पेपर्स असावेत. त्यात त्या कलेचा सखोल इतिहास, तिच्यातील तंत्राचा विकास व वापर वगैरे गोष्टी असाव्यात. अर्थात सर्व कला शिक्षण हे मुख्यतः कार्यशाळातच होईल हे इथे गृहीत धरले आहे. तिसऱ्या वर्षी विद्यार्थ्याला भारतीय तत्त्वज्ञान व आंतरराष्ट्रीय विज्ञान यांचा परिचय खोलवर व्हावा. पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाचा परिचय असावा. चौथ्या वर्षी सर्वच पेपर्स त्या कलांचे असावेत व हे संपूर्ण वर्ष त्या विद्यार्थ्याला त्याच्या आवडीच्या कलेतच काम करायला मिळावे. भारतीय तत्त्वज्ञानात चौदा दर्शनांपासून अलीकडील गांधी, कृष्णमूर्ती, रजनीश वगैरे तत्त्ववेत्त्यांपर्यंत सर्वांचा समावेश असावा. मात्र हे तत्त्वज्ञान सामाजिक पार्श्वभूमीसहित शिकविले जावे. हीच गोष्ट विज्ञानाबाबतही आहे. कलावंत जी कला शिकतो आहे तिच्यामागचे सर्व विज्ञान त्याला कळलेच पाहिजे. साहित्य शिकणाऱ्याला त्यामुळे अर्थातच भाषाविज्ञान सक्तीचे होईल हे सांगायला नकोच. चित्रकाराला आकारामागील भौतिकशास्त्र, रंगामागील रसायनशास्त्र व भौतिकशास्त्र वगैरे शास्त्रीय पार्श्वभूमी शिकावीच लागेल. हीच गोष्ट चित्रपटकार, नाट्यकर्मी वगैरे कलावंतांबाबतही लागू आहे. कलांमध्ये पहिली दोन वर्षे भारतीय नृत्य, भारतीय नाटक, भारतीय साहित्य, भारतीय चित्र, भारतीय शिल्प, भारतीय चित्रपट, भारतीय संगीत, भारतीय स्थापत्य, भारतीय छायाचित्रण वगैरे विषय शिकवावेत. त्यांचीच उदाहरणे असावीत. तंत्रे व शैली मात्र दोन्ही पद्धतीची घोटवून घ्यावी. पाश्चात्त्य विचारांचा परिचय करून देताना प्लेटो-आरिस्टॉटलसारखे म्हातारे विचारवंत सरळ फेकून द्यावेत. तिकडे रद्दीत जमा झालेल्या लोकांना

कडे अजिबात थारा देऊ नये. त्याऐवजी समकालीन विचारवंतांना, समकालीन संप्रदायांना हत्त्वाचे स्थान द्यावे. उदाहरणार्थ, १९९५ साली ही योजना राबवायची असेल तर सस्यूर, बार्थ, देरीदा वगैरे विचारवंत तर उत्तर आधुनिकतावाद , उत्तर औद्योगिकतावाद वगैरे संप्रदायांना अभ्यासक्रम आखताना स्थान असावे. भारतातील मात्र भरतमुनीपासून द. ग. गोडशांपर्यंत, वैदिक तत्त्वज्ञानापासून रजनीशांपर्यंत सर्वच विचारवंत शिकवावेत.

प्राचीन भारतीय तत्त्वज्ञान शिकवताना सध्याच्या काळात आपण एक गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे. ती म्हणजे प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानात आढळणाऱ्या दोन प्रवृत्ती. पहिली प्रवृत्ती ही शाश्वतवादी अध्यात्म (स्टॅटिक स्पिरिच्युयालिझम) सांगते. सर्वसाधारणपणे सर्वच हिंदू दर्शने ह्या शाश्वतवादाचा पुरस्कार करणारी आहेत. ब्रह्म सनातन आहे, स्थिर आहे, शाश्वत आहे हे ह्यामागचे गृहीतक. ह्या शाश्वतवादानेच भारताची वाट लावली. शाश्वतवादावरचा हा विश्वास भारतीयांना आळशी बनवायला कारणीभूत ठरला. पाश्चात्त्य धर्मात ईश्वर शाश्वत असला तरी जन्म एकच असल्याने मिळालेल्या एकाच जन्मात सर्व भोगण्याची वृत्ती बोकाळली. त्यामुळे तिथे आयुष्य प्रचंड गतिमान आहे. आशियात ईश्वरही शाश्वत आणि जन्म अनंत असल्याने ह्या जन्मी नाही तर पुढील जन्मी ही प्रवृत्ती प्रचंड बोकाळली. आयुष्य काही कुठे पळून जात नाही. ते पुन्हा आहेच ह्या विचाराचा भारतीयांच्या नेणिवेवर खोल प्रभाव पडला आहे. जोपर्यंत ही प्रवृत्ती जाऊन त्या जागी अशाश्वत गतिशील अध्यात्म भारतात येत नाही तोपर्यंत भारताचा विकास होणे शक्य नाही. डायनॅमिक स्पिरिच्युयालिझमचे तत्त्वज्ञान भारतीयांनी स्वीकारायला हवे. भारतात ही दुसरी प्रवृत्ती बौद्ध तत्त्वज्ञानात व काही प्रमाणात जैन तत्त्वज्ञानात आढळते. जैनांच्यात ईश्वर नाकारल्याने तर बौद्धांनी सर्व काही बदलत असते अशी सत्याची गतिशील व्याख्या केल्याने ह्या आध्यात्मिक प्रवृत्ती गतिशील झाल्या. भोवतालचे विश्व सतत बदलत असते, त्यामुळे आताचा क्षण संपूर्ण जग हेच बौद्ध तत्त्वज्ञानाचे सार आहे. जपानमध्ये झेन तत्त्वज्ञानाने बौद्ध तत्त्वज्ञानाचे हे सार अचूक पकडल्याने तो देश प्रचंड गतिशील झालेला दिसतो. ह्याउलट भारत हिंदू तत्त्वज्ञानाला बळी पडून बदल करायला सतत नकार देत राहिला. उपनिषदातील आनंदाचे मोकळे गाणे आणि तत्त्वज्ञानही त्याने नीट स्वीकारले नाही. त्यामुळे भारतीय समाजाची अवस्था भूक मेलेल्या पण जिवंत असलेल्या डायनासोरसारखी झाली आहे. प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानातील दोन धारणांपैकी गतिशील आध्यात्मावरच (डायनॅमिक स्पिरिच्युयालिझम) मानव्य शाखांच्या आणि कला शाखांच्या अभ्यासक्रमात भर द्यायला हवा. सत्य हे सतत नित्यनूतन असते, शाश्वत नसते हे जोपर्यंत आपण लक्षात घेत नाही तोपर्यंत

आपली मानसिक प्रवृत्ती बदलणार नाही. भारतीय माणूस स्थैर्याच्या प्रचंड मागे लागलेला दिसतो. अस्थैर्यातच माणूस खरा जगतो हे त्याला पटत नाही. त्यामुळे भारतीय माणूस सतत तडजोडीच्या मूडमध्ये असतो. त्यामुळे भारत फक्त चांगले सांगकामे नोकर निर्माण करतो. (ह्या भारतीय नोकरांना त्यामुळेच अमेरिकेत चांगली मागणी असते. चांगल्या स्थैर्याच्या बदल्यात हे आमचे बुद्धीचे क्रीम वगैरे असणारे संशोधक आरामात आपली डोकी गहाण टाकायला तयार असतात.) कारण नोकरीत स्थैर्य असते. मालकीपणात अस्थैर्य पत्करावे लागते. थोडक्यात, तांत्रिक पातळीवर आपणाला सध्या तरी गतिशील अध्यात्माशिवाय तरणोपाय नाही.

कलाशिक्षण असो की विज्ञान शिक्षण असो, शिक्षणाचे मुख्य ध्येय "संपूर्ण मुक्ती" हेच असलं पाहिजे. ह्या मुक्तीला बुद्धाने निर्वाण, महावीराने कैवल्यप्राप्ती, हिंदू तत्त्ववेत्त्यांनी मोक्ष म्हटलं. आधुनिक काळात मुक्तीची व्याख्या बदलावी लागेल. मुक्ती म्हणजे स्वतःच्या मूळ व्यक्तिमत्त्वाला संपूर्ण उपलब्ध होणे होय. माणूस स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाला संपूर्ण उपलब्ध झाला म्हणजे आनंदाला उपलब्ध होतो. शिक्षणातही शिक्षक व विद्यार्थी या दोघांनाही शिकणे हा आनंद वाटला पाहिजे. विज्ञानशाखेचा विद्यार्थी स्वतःमधील वैज्ञानिकाला, तर कला शाखेतील विद्यार्थी स्वतःमधील कलावंताला व मानव्यशाखेतील विद्यार्थी स्वतःमधील मानव्यशास्त्रज्ञाला संपूर्ण उपलब्ध झाला पाहिजे. कलावंत कलांतून, वैज्ञानिक विज्ञानातून तर मानव्यशास्त्रज्ञ मानव्यविज्ञानातून स्वतःलाच फुलवत असतो. त्यामुळे त्याला ह्या व्यक्तिमत्त्वाला उपलब्ध करण्यास मदत करणे हाच शिक्षणाचा व पर्यायाने शिक्षकांचा हेतू असायला हवा. आज आपण कलावंत, वैज्ञानिक, मानव्यशास्त्रज्ञ निर्माण करण्याऐवजी साच्याचे गणपती घडवू लागलोय. कारागीर, कारकून आणि नोकर निर्माण करणाऱ्या फॅक्टऱ्या म्हणजे आजच्या शिक्षणसंस्था असे बाजारी स्वरूप शिक्षणाला आले आहे. विद्यार्थी यंत्रे व शिक्षणसंस्था कारखाने हे चित्र बदलायचे असेल तर Teacher must be gardener हे सूत्र आपण लक्षात ठेवायला हवे. माळी झाडाला हवे तसे वाढू देतो. तो झाड तयार करत नाही तर त्याला खतपाणी घालतो. तसेच शिक्षकाने असायला हवे. आंब्याच्या बीजातून आंबा, फणसाच्या बीजातून फणसच निर्माण होणार. आम्ही हल्ली सर्वच विद्यार्थ्यांचे हापूस आंबे करून ते समाजात निर्यात करू इच्छितो. ह्यातून एखाद-दुसरा आंबा तयार होतो. उरलेली बीजे जी उत्तम फणस, उत्तम चिक्कू झाली असती ती आपसूकच मारली जातात. तेव्हा शिक्षणाचा मुख्य हेतू त्या विद्यार्थ्यांला त्याचे स्वतःचे सृजनशील व्यक्तिमत्त्व संपूर्ण उपलब्ध करून देणे हाच असला पाहिजे. आज आपण पैशाला हपापलेले व किर्तीला चटावलेले कारागीर, तंत्रज्ञ, राजकारणी, समाजकारणी निर्माण क्ररत आहोत. त्याऐवजी कलासंकुलातून सृजनशील

कलावंत, विज्ञान मानव्य महाविद्यालयातून सृजनशील भांडवलदार, व्यवस्थापक, राजकारणी, समाजशास्त्रज्ञ बाहेर पडतील तरच ह्या देशाला भवितव्य आहे. कलासंकुलात वाङ्मय शिकणारा विद्यार्थी हा स्वतःच सृजनशील कलावंत बनायला हवा. त्याला तेच शिक्षण मिळायला हवे.

शिक्षणातील शिक्षक हा महत्त्वाचा घटक असल्याने ह्या संदर्भात खालील गोष्टी शिक्षकांनी तातडीने लक्षात घ्यायला हव्यात आणि आपणही शिक्षकाबाबतीत काही गोष्टी करणे अत्यंत आवश्यक आहे.

(१) प्राथमिक व माध्यमिक शाळेतील शिक्षण हाच विद्यार्थ्यांच्या जडणघडणीचा कालखंड असतो. त्याच्या व्यक्तिमत्त्वातील सुप्त क्षमता ह्याच काळात कळतात. त्यामुळे विद्यार्थ्याला हाताळण्यासाठी सर्वात चांगले शिक्षक ह्याच काळात त्याला मिळायला हवेत; पण प्रत्यक्षात नेमके उलटे घडते. ह्याला कारण आपल्याकडे (खरेतर जगभर) प्राथमिक शिक्षकाला पगार सर्वात कमी व प्राध्यापकांना सर्वात जास्त असतो. त्यामुळे जे चांगले शिक्षक असतात ते नेहमीच प्राध्यापक होणे पसंत करतात आणि प्राथमिक शिक्षक म्हणून आपल्या हाती गाळ येतो. हे जर बदलायचे असेल तर क्रम उलटा करायला हवा. प्राथमिक शिक्षकांना पगार सर्वात जास्त व प्राध्यापकांना त्याहून कमी द्यायला हवा. व्यावहारिक पातळीवर प्राध्यापक हे स्वीकारणार नाहीत; तर निदान प्राथमिक, माध्यमिक शिक्षकांचा पगार प्राध्यापकांच्या बरोबरीने आणायला हवा. पाया भक्कम असेल तर इमारत नीट उभी राहते. स्थापत्यकलेचा एवढा नियम शिक्षणात पाळायला हवा.

(२) चांगल्या शिक्षकाला आधिक पगार व वाईट शिक्षकाला कमी पगार असे गुणवत्तेच्या निकषावर वेतन द्यायला हवे. ज्या शिक्षकाच्या पिरीयडसना विद्यार्थी आधिक हजेरी लावतात त्याला अधिक वेतन मिळायला हवे. जर शक्य झाले तर आपली पद्धत एवढी लवचिक असायला हवी, की विद्यार्थ्यांनीच त्या त्या पिरीयडचे वेतन त्या त्या शिक्षकाला द्यावे. किंवा महिन्याची फी त्याला द्यावी. त्यामुळे ह्या क्षेत्रात जे अडाणी शिक्षक आहेत ते आपोआपच निघून जातील आणि चांगले शिकवणाऱ्यांना अधिक पैसा मिळेल. आज क्लासेसच्या सिस्टीममध्ये खाजगी पातळीवर ही गोष्ट आलीच आहे ती सरकारी पातळीवर आणायला काहीच हरकत नाही. ज्या विद्यार्थ्यांना फी देणे शक्य नाही त्यांची फी सरकारने विद्यार्थी ज्याप्रमाणे हजेरी लावेल त्या प्रमाणे द्यावी. पूर्वी हे सगळे करणे अवघड होते, पण आता संगणक आल्याने हे सहज शक्य आहे. प्राथमिक शाळेत हे कदाचित शक्य होणार नाही. पण माध्यमिक व महाविद्यालयीन पातळीवर हे शक्य आहे. निदान महाविद्यालयीन पातळीवर तरी ही पद्धत राबवायलाच प्रथम सुरुवात करावी.

(३) आपल्याकडे आजचा शिक्षक एक नोकरशहा बनलाय; त्यामुळे तो पाट्या टाकतोय. मध्यंतरी तथाकथित समाजवादाचे वारे सर्वच देशांच्या पायावरून गेल्याने सर्वच देशांना लकवा मारलाय. सुदैवाने भांडवलशाही विजयी झालीये. तिचा अंगीकार करून शिक्षकांना ज्या स्थिर नोकऱ्या दिल्या जातात त्या बंद कराव्यात. आम्हा भारतीय लोकांना स्थैर्य ह्या गोष्टीची इतकी सवय झालीये की अस्थैर्यातच चैतन्य असते ही गोष्ट आम्ही साफ विसरून गेलोय. आमचे सर्वच शिक्षक परमनंट झाले की बनचुकेपणा दाखवतात. खरेतर शिक्षकच नव्हे तर सरकारी नोकराबाबतही हीच स्थिती आहे. हे परमनंट करायचे प्रकरण येती पन्नास वर्षे तरी आपण बंद करावे. फार फार तर पाच-दहा वर्षांचे करार करावेत; मात्र वीस वर्षे सर्व्हिस केली की शिक्षकाला पेन्शन वगैरे सवलती मिळायलाच हव्यात; किंबहुना इतर कुठल्याही सेवेपेक्षा इथे पेन्शन जास्त मिळणे आवश्यक आहे.

(४) शिक्षकांनी आधुनिक काळात ज्या गोष्टी समजून घेणे आवश्यक आहे त्यांतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे शिक्षकाचे बदललेले स्थान. पूर्वी शिक्षणात गुरू केंद्र होता, तर विद्यार्थी परीघ होता; पण आज ज्ञानाचा स्फोट (explosion of knowledge) झाल्याने विद्यार्थी हा शिक्षणाचा केंद्र व गुरू परीघावर आला आहे. दरवर्षी ज्ञानात इतकी नवीन नवीन भर पडत चाल्लीये की मानवाला जे ज्ञान गेली तीन हजार वर्षे नव्हते ते विसाव्या शतकाच्या पहिल्या पन्नास वर्षांत प्राप्त झाले आहे. गेल्या पन्नास वर्षांत जेवढे ज्ञान होते तेवढे ज्ञान ह्या पाच वर्षांत प्राप्त झाले आहे. त्याचा परिणाम आज असा झाला आहे की, सजग विद्यार्थी हा गुरूपेक्षा अधिक आधुनिक ज्ञानाने व्याप्त असू शकतो; कारण बहुतेक गुरू काही वर्षांनंतर थांबतात. त्यांची ज्ञानलालसा कमी होते. त्याउलट विद्यार्थी नुकताच शिकायला लागल्याने तो जुने आत्मसात करून नवीन ज्ञानाकडे जातो. तेव्हा ह्यापुढे शिक्षकालाही सतत शिकायला लागणार. पूर्वी ज्ञानाची वाढ अतिशय संथ असे. त्यामुळे साहजिकच गुरूकडे अनुभव व आयुष्य ह्या दोन्ही गोष्टी जास्त असल्याने त्याच्याकडे शिष्यापेक्षा नेहमीच ज्ञान जास्त असे. आता मात्र ती स्थिती राहिलेली नाही. त्यामुळे old is gold हे खरे असले तरी New is Platinum And Uranium हेही तितकेच खरे आहे, तेव्हा शिक्षकाने शिकण्याची क्रिया चालू ठेवावी नाहीतर विद्यार्थी ओल्ड इज ॲल्युमिनियम म्हटल्याशिवाय राहणार नाहीत. किंबहुना अशा ॲल्युमिनियमची क्वान्टीन्टी वाढते आहे. ह्या ज्ञानाच्या स्फोटामुळे जो आदर पूर्वी गुरूला मिळत होता तो आता मिळणार नाही; किंबहुना गुरू म्हणजे ज्याला लेक्चरला जाण्यापूर्वी दोन तास आधी जे ज्ञान तो विद्यार्थ्यांना देणार आहे ते माहित असलेला मनुष्य अशी आधुनिक व्याख्या झाली आहे. त्यामुळे शिक्षकांनी

गुरुपोर्णिमेची, त्या आदराची अपेक्षा बाळगू नये. आजकाल गुरू व शिष्य दोघेही शिकत असतात. अनेकदा गुरूच थांबतो व विद्यार्थी पुढे जातो. त्यामुळे ब्राह्मण व क्षत्रिय जाणिवेत गुरूची जी ईश्वरासारखी किंवा राजासारखी भूमिका होती ती सोडून त्याने वैश्य जाणिवेतील मित्राची भूमिका स्वीकारावी. पूर्वी विद्यार्थी आंधळा व गुरू ज्ञानाचे डोळे असलेला डोळस, शिष्याला तिमिरातून प्रकाशाकडे नेणारा असा होता. आता दोघेही डोळस आणि दोघांनांही प्रकाशाकडे जाणारे सहयात्री म्हणून प्रवास करायचा आहे. दोघांत गुरूला चालण्याचा अनुभव अधिक आहे एवढंच.

(५) हल्ली सर्व शिक्षण म्हणजे माहिती पुरवणारी केंद्रे झाली आहेत. भूतकाळात काय झाले त्याची माहिती फक्त शिक्षक देतात. संगणकाच्या ह्या युगात इन्फर्मेशन फिडींग आऊट ऑफ डेट वाटते; कारण तेच काम करायचे असेल तर शिक्षकाऐवजी शाळेत कॉम्प्युटर बसवलेले जास्त चांगले. तेव्हा Teacher shouldn't be a computer; he should be gardner हे आपण लक्षात ठेवायला हवे. To educate ह्या क्रियापदाचा मूळ अर्थ To draw out हा आहे. तेव्हा जे आत आहे ते बाहेर काढणे अत्यंत आवश्यक आहे. किंबहुना शिक्षकाचे हे महत्त्वाचे कार्य आहे. त्यासाठी विद्यार्थ्याला शंकेखोर बनवणे, विचार करायला शिकवणे हे महत्त्वाचे आहे; किंबहुना कसे शिकायचे हे विद्यार्थ्याला शिकवणे म्हणजे शिक्षण होय.

(६) शिक्षणक्षेत्रात विसाव्या शतकात घडलेली सर्वात मोठी घटना म्हणजे प्रथमच विद्यार्थी व विद्यार्थिनी एवढ्या मोठ्या संख्येने एकत्र शिक्षण घेऊ लागले. भारतात सर्व जातिधर्माचे युवक व युवती सर्व स्थळी एवढ्या मोठ्या प्रमाणावर एकत्र येण्याची ही पहिलीच वेळ आहे. त्यामुळे कधी नव्हे ते तरुणांचे संघटन आज शक्य झाले आहे. ह्या संघटनातून काही प्रश्न निर्माण होणे अटळ आहे. शिक्षकांनी ह्या प्रश्नांना खुल्या दिलाने सामोरे जाणे आवश्यक आहे. समाजानेही विद्यार्थी संघटन ही वस्तुस्थिती स्वीकारली पाहिजे. अलीकडेच सुधाकरराव नाईकानी मुख्यमंत्री असताना चांगले विद्यार्थी निवडून येत नाहीत म्हणून इलेक्शन्स बंद करण्याचा फतवा काढलाय. समस्येपासून आपण कसे पळ काढत असतो त्याचे हे उदाहरण आहे. एखादी गोष्ट नीट चालत नसेल तर त्यावर बंदी हा काही योग्य उपाय असू शकत नाही. नाईकांचेच तर्कशास्त्र त्यांच्या राजकारण क्षेत्राला लावले तर भारतातील सर्व निवडणुका बंद कराव्या लागतील, कारण ह्या निवडणुकांतूनही चांगले राजकारणी निवडून येत नाहीत; पण आपल्या निवडणुका बंद कराव्यात असे कुठलेच राजकारणी म्हणणार नाहीत; पण विद्यार्थ्यांच्या निवडणुका बंद करायला शिक्षकांपासून राजकारण्यांपर्यंत सर्वजण तयार. वास्तविक लोकशाहीची खरी आणि खोटी ताकद, तिचे गुणदोष ह्या विद्यार्थी निवडणुकांत कळतात हेही एक तऱ्हेचे शिक्षण असते, तेव्हा विद्यार्थ्यांच्या संघटनात्मक

प्रश्नाला शिक्षकांनी खुल्या दिल्याने सामोरे जावे हे उत्तम.

(७) आधुनिक शिक्षणातील लैंगिकतेचा प्रश्न हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. प्राचीन काळी हा प्रश्न निर्माण झाला नव्हता; कारण स्त्रीपुरुष एवढ्या मोठ्या प्रमाणावर एकत्रच येत नव्हते. कारण स्त्रीला मुळात शिक्षणाचा अधिकारच नव्हता स्त्रियांचे शिक्षण हे अनेकदा झालेच तर घरी होत असे. त्यातच दुसरी महत्त्वाची बाब म्हणजे मुलामुलींचे लग्न लहानपणीच ठरे किंवा वयात आल्या आल्या ताबडतोब होई. त्यामुळे वयात आल्या आल्या स्त्रीपुरुषांना लैंगिक सुख मिळत असे. Sex Starvation अस्तित्वातच नव्हते. त्यातच प्राचीन काळी आपला कामाकडे बघण्याचा दृष्टिकोन निर्मळ व निकोप होता. त्यामुळेच कामशिल्पे व कामशास्त्रे इथे निर्माण झाली; पण नंतर धार्मिक शिकवणुकीने आणि इंग्लडच्या तथाकथित ख्रिश्चन प्युरीटनीझममुळे कामवासनेबाबतची पापभावना वाढीस लागली. आधुनिक काळात शिक्षणाचे वय २५ वर्षापर्यंत गेले आहे. त्यामुळे वय वर्षे १६ ते २५ ह्या कालखंडात ह्या कामाचे करायचे काय ? हा प्रश्न प्रथमच निर्माण झाला आहे. कारण प्रथमच वय वर्षे १६ ते २५ ह्या दरम्यानचा तरुण-तरुणींचा वर्ग एवढ्या मोठ्या संख्येने एकत्र येत आहे. ह्यासाठी आपल्यापुढे दोन मार्ग आहेत; पहिला गांधीवादी ब्रह्मचर्याचा व दुसरा आपल्या आदिवासी परंपरेत असलेल्या युवागृहाचा ! ह्यातील पहिल्या पर्यायात आवश्यक असलेला संयम जिथे गांधींजवळच नव्हता तिथे तो सामान्य माणसाला साधेल हे अशक्य आहे. कामदमनाचे वाईट परिणाम आधुनिक मानसशास्त्रज्ञांनी सिद्ध केले आहेत. तेव्हा भारतीय परंपरेतील आदीवासी जमाती जशा राहतात, नवीन नवीन Sex partner बरोबर रात्र घालवतात व त्यातून पती-पत्नी शोधून तिच्याशी / त्याच्याशी विवाह करतात, तशीच मोकळीक नवीन पिढीला द्यावी. ह्यासाठी दोन गोष्टी व्हायला हव्यात. कॉलेजमधे आज सर्वत्र जी कॅन्टिन्स आहेत त्यांचे युवागृहात रूपांतर करायला हवे, की तिथे जेवणापासून नृत्यापर्यंत सर्व गोष्टींची सोय करायला हवी. ह्या युवागृहांत त्याला जोडूनच वीस खोल्या बांधाव्यात. मधला हॉल हा नृत्यापासून नाटकापर्यंत, फॅशन शोपासून सेमिनारपर्यंत सर्वच गोष्टींना वापरता येईल एवढा मोठा असावा. अर्थात सेमिनारच्या वेळी व शिक्षणाच्या वेळी खोल्या बंद असाव्यात व सायंकाळी त्या खुल्या कराव्यात. आजकाल मुलामुलींच्या वसतीगृहात विरोधी सेक्सला आत यायला परवानगी असत नाही. क्वचित मुंबईत हॉस्टेल-डेला ही परवानगी दिलेली आढळते. त्याऐवजी सर्वच सुट्ट्यांच्या दिवशी अशी अनुमती द्यावी. जर शक्य असेल तर सातही दिवस ही अनुमती द्यावी. विद्यार्थी किंवा विद्यार्थिनी खोलीत काय करतात तो त्यांचा खाजगी प्रश्न आहे. त्यात उगाच शिक्षकांनी ढवळाढवळ करू नये. लैंगिक संबंध ह्या वयात येणे हे नैसर्गिक आहे. त्यामुळे पहिली

गोष्ट ज्या वयात हा अनुभव घेणे नैसर्गिक आहे त्या वयात अनुभव घेतला जाईल. दुसरी गोष्ट कंडोमचा शोध लागल्याने आणि आजकाल वयात आलेल्या सर्वांना कंडोम ही काय भानगड आहे हे समजत असल्याने (इथे कॉलेजमध्ये लैंगिक शिक्षण दिले जाणार हे गृहीत धरले आहे. एडसमुळे आज ते काही महाविद्यालयात अपरिहार्य म्हणून चालू झाले आहे) गर्भधारणा टाळता येतील. ह्या गोष्टीचा सर्वात मोठा फायदा म्हणजे आज विद्यार्थी व विद्यार्थिनींचा जवळ जवळ ७०% काळ हा Sex starvation मुळे Sex वर चर्चा करण्यात जातो. ह्यातील बरीचशी चर्चा वायफळ व खोट्या फुशारक्या मारणारी असते. ह्या वेळेतील किमान ३५% वेळ आपणाला सहज वाचवता येईल. वसतिगृहातील सुधारणा ह्यासाठीच सुचवली की, भारतात जागेची टंचाई आहे. निवांत संग करावा अशा जागा मिळत नाहीत. ह्यातून श्रीमंत विद्यार्थी-विद्यार्थिनी हॉटेलमध्ये रूम भाड्याने घेऊन जे करायचे ते करतात. गरीब विद्यार्थ्यांची मात्र पंचाईत होते. अनेकदा तर ह्यासाठी मुलाला किंवा मुलीला शहराबाहेर किंवा घराबाहेर न्यावे लागते आणि त्यात भरपूर वेळ जातो. खरेतर आख्खा दिवस जातो. वसतिगृहे खुली केली तर सर्वांचाच वेळ वाचेल आणि हा वेळ विद्यार्जनात खर्च करता येईल.

(८) आपल्या शिक्षण पद्धतीतील आणखी एक मोठा घोळ म्हणजे आपल्या शिक्षणाच्या वेळा. आपल्या ऑफिसच्या आणि शिक्षणाच्या वेळा म्हणजे पाश्चात्त्यांचे मूर्ख अनुकरण आहे. संपूर्ण समाजव्यवस्थाच ह्या वेळेच्या बाबतीत मूर्खपणाला बळी पडलेली आहे; किंबहुना आपल्या मूर्खपणाचा कळस म्हणजे आपल्या कामकाजाच्या वेळा. भारतीय हवामानाचा विचार करता इथे दुपारी काम करणे योग्य नव्हे. प्राचीन काळी दुपारी वामकुक्षी घेत असत आणि शास्त्रीयदृष्ट्या ती बरोबर होती. विद्यार्थीही ह्याला अपवाद नसत. विद्यार्थ्यांचे काम पहाटेपासून सुरू होई. ह्याचे पुनरुज्जीवन होणे आवश्यक आहे. सर्व महाविद्यालयांतील दुपारचे वर्ग बंद करून ते सकाळी व सायंकाळी भरवायला हवेत. आज कितीतरी विद्यार्थी ह्या वेळात क्लासेसना जातात. जे विद्यार्थी क्लासेसना जातात, ते त्यासाठी लवकर उठतात. ते शाळेत पहाटे निश्चित येतील. खरंतर भारतातील सर्व ऑफिसेस व दुकाने ही दुपारी बंद हवीत; अर्थात आधुनिक काळात ए. सी. ची सोय झाल्याने कृत्रिम ताजेपणाही निर्माण करता येईल त्यामुळे जिथे संपूर्ण महाविद्यालय एसी करणे शक्य असेल तिथे हवे तेव्हा वर्ग भरवावेत; अन्यथा प्राचीनकाळी सकाळी व संध्याकाळी वर्ग भरत, तीच पद्धत आपण परत चालू ठेवावी.

(९) आपल्या सर्व शिक्षणात सुट्ट्या हाही असाच डोकेदुखीचा विषय आहे; किंबहुना सर्वांचाच तो प्रश्न आहे. इंग्रज हे ख्रिश्चन असल्याने व ख्रिश्चनांना रविवारी चर्चला जाणे आवश्यक

असल्याने (त्यांच्या धार्मिक शिकवणूकीतच आठवड्यात एक दिवस विश्रांती घे अशी धर्माज्ञा आहे) रविवारी सुटी घेणे गरजेचे आहे. आपण भारतीयांनी हल्ली कसलाही विचार न करता रविवार व शनिवार सुट्टी म्हणून स्वीकारलेत. ही एक आपण करत असलेली चूकच आहे. आपणाकडे उत्सवांच्या व सणांच्या दिवशी सुट्ट्या असत. त्यांचा इथल्या भूगोलाशी काही संबंध असे. ह्या सुट्ट्यांचेही पुनरुज्जीवन व्हायला हवे, मात्र भारतीय परंपरेनुसार ह्या सुट्ट्या घरी बसून न घालवता रंगपंचमी, होळी, दिवाळी, नवरात्र हे उत्सव त्या त्या महाविद्यालयात उत्साहाने साजरे व्हायला हवेत. ह्या दिवशी नृत्य,चित्रपट वगैरेंचा जल्लोष उडायला हवा. तेव्हा शनिवार रविवारच्या सुट्ट्या रद्द करून वैज्ञानिक दृष्टिकोनातून आपल्या हवामानाला पूरक ठरतील अशा पद्धतीने उत्सवाच्या व सणांचा सुट्ट्या साजऱ्या कराव्यात. भारताला ज्या सामाजिक संघटनाची गरज आहे त्याचा पाया इथे आपोआपच घातला जाईल.

(१०) आज आपल्या माध्यमिक शाळांत व कलाक्षेत्रात साहित्याची जी दादागिरी चालू आहे ती नष्ट व्हायला हवी. आज एम. ए. सारख्या डिग्र्या फक्त साहित्यातच असतात. त्याऐवजी चित्रपट, नाटक ह्यामध्ये ह्या डिग्र्या चालू होऊन त्या केंद्रस्थानी असायला हव्यात. प्राचीन काळी साहित्य हीच मुख्य कला होती. आधुनिक काळात चित्रपट हीच मुख्य कला झाली आहे. सर्वच वर्तमानपत्रांच्या कला पुरवण्यांत आज चित्रपट डॉमिनेट झालेला आहे; कारण तो खरोखरच सर्वात लोकप्रिय कलाप्रकार आहे. आज आपण दैनंदिन जीवनात जेवढा वेळ टी.व्ही. आणि चित्रपट बघण्यात घालवतो तितका वेळ साहित्य वाचत नाही हे सूर्यप्रकाशाइतके स्वच्छ आहे. असे असूनही आपण शिक्षण मात्र साहित्यालाच केंद्रस्थानी ठेवून देत आहोत. त्यामुळे शिक्षणातून साहित्याचे विस्थापन (Displacement of Literature) व्हायला हवे ती काळाची गरज आहे. साहित्यातले अलंकार कळण्यापेक्षा चित्रपटाची शॉट डिव्हिजन कळणे आधिक आवश्यक आहे. पाश्चात्त्य देशांनी ही गरज अद्याप नीट ओळखलेली नाही. त्यांनी ओळखली नाही म्हणून आपण ओळखूच नये असं नाही. ह्याचा पाया आपण प्राथमिक शिक्षणातच घालायला हवा. भाषा आणि चित्रपट यांचा संयुक्त अभ्यासक्रम आपण तयार करायला हवा. कविता ही भाषांचा सर्वोत्कृष्ट आविष्कार असते हे ओळखून विद्यार्थ्यांना कविता शिकवणे आधिक गरजेचे आहे. कवितेत अपंग व्यावहारिक भाषा हनुमानउडी घेत असते. तिचे व्याकरण हवे तसे मोडत असते. त्यामुळे कवितेचे प्रभुत्व हे भाषेवर प्रभुत्व मिळवण्याचे सर्वात उत्कृष्ट साधन असते. तेव्हा ह्या अभ्यासक्रमात कविता हे साहित्यरूप म्हणून, तर कथा व कादंबऱ्याचेऐवजी नाटक व चित्रपट ह्यांचा समावेश असावा. शाळेत बालचित्रपटकथा व बालनाटके टेक्स्टबुकात असावीत. हे चित्रपट

प्रत्यक्ष दाखविले जावेत व बालनाटके विद्यार्थ्यांकडून बसवून घेतली जावीत. ह्यासाठी मुद्रयांचा वापर करावा. काही धडे गद्यरूप असावेत. नाटक व चित्रपटामुळे आयुष्याच्या तांत्रिक अंगांचा आपोआपच परिचय होईल. माध्यमिक शाळेतही ५०% वजन साहित्याला व ५०% वजन नाटक-चित्रपटाला असावे. मात्र इथे विद्यार्थ्यांना समीक्षक बनवण्याऐवजी कलावंत बनवायचा प्रयत्न हवा. विद्यार्थी एखाद्या कवितेवरील, कथेवरील प्रश्नांची काय उत्तरे देतो ह्यापेक्षा त्या विषयावर कशी कविता लिहितो, कशी कथा लिहितो त्यानुसार त्याची गुणवत्ता जोखली पाहिजे. आज अभ्यासक्रमात आकलनात्मक बाजूवर नको तितका भर आहे. त्याऐवजी सृजनात्मक बाजूवर भर असायला हवा. विज्ञानाचे अथवा मानव्यशास्त्रांचे अध्ययन करतानाही हाच विचार असायला हवा. तो विद्यार्थी प्रयोगशाळेत काय करतो, वैज्ञानिक विचार कसा करतो ह्यावर भर हवा.

आपला देश गेली कित्येक शतके नाचणे साफ विसरून गेलाय. हल्ली हल्ली आम्ही पोरे दांडिया खेळायला लागलोय, तर आमच्या संस्कृतीरक्षकांना तेही बघवत नाही असे दिसते. पाश्चात्त्य देशांत पार्टी किंवा फंक्शनच्या निमित्ताने नृत्याचा परिचय लहानपणापासून होतो व ते लोक सतत नाचताना दिसतात. आपणाला आदिवासींकडे जाऊन त्यांची नृत्ये सामावून घेऊन बॉलडान्ससारखे नृत्यप्रकार विकसित करायला हवेत. भांगडा, गरबा, कोळी ही नृत्ये आपण स्वीकारायला हवीत व ती आपल्या सर्व समारंभांची व उत्सवांची नृत्ये बनायला हवीत. त्यासाठी वर्गात शारीरिक शिक्षणाबरोबर (Physical Training) नृत्याचे शिक्षण द्यायला हवे. त्यामुळे एकीकडे व्यायामाची आवड निर्माण होईल तर दुसरीकडे नृत्य कला म्हणून विकसित होईल. माध्यमिक शाळेत आज स्पेशल विषय म्हणून चित्र किंवा संगीत कला म्हणून शिकवल्या जातात. त्यांचा परीघ वाढायला हवा. अलीकडे प्रार्थनांचा वेळ कमी केलाय तो पुन्हा वाढवायला हवा. त्यातून संगीत व शब्द ह्या दोन्हींची सवय लागते. मॅट्रिकपर्यंत विद्यार्थी एका तरी कलेत तयार व्हावा. आज भारतात कला, विज्ञान व मानव्यविज्ञान या तिन्ही गोष्टी मृत झाल्या. आता सर्वांनीच त्यात नवीन उन्मेष निर्माण करायला हवा. त्यासाठी हे मूलभूत बदल आवश्यक आहेत. आपल्याकडेच भाषाविज्ञानापासून भौतिकशास्त्रापर्यंतचे सर्व तज्ज्ञ शिक्षणावर साहित्यावर केवळ ॲकॅडमिक चर्चा करत असतात. मूलभूत गोष्टीतच बदल हवा हे कुणी लक्षात घेत नाही. जर भारतीय जीवन गतिशील बनवायचे असेल तर Dance is the ethusiam of society हे तत्व प्रत्यक्ष आचरणात आणायला हवे. पोरं वेडीवाकडी नाचतात म्हणून त्यांना नाकं मुरडण्यापेक्षा ती तालात कशी नाचतील ते आपण पाहायला हवे. किंबहुना असे पाहणे हेच विधायक आहे.

नृत्य शिकवता शिकवता आपण भारतीयांच्या सर्व जगानं मान्य केलेल्या ध्यान व योग

पद्धती स्वीकारायला हव्यात. ह्या गोष्टींचे महत्त्व प्रथम विद्यार्थ्यांना शिकवायला हवे आणि मग त्यांच्याकडून सराव करून घ्यायला हवा. नृत्यामुळे शरीर व ध्यान व योगामुळे मन फ्रेश रहाते. महाविद्यालयीन शिक्षणात तर ह्यांचा सखोल अभ्यास हवा. भारतीय दर्शने मग ते वैदिक असो की अवैदिक तंत्रात्मक असो की नाथसंप्रदायी असो समजायची असतील तर ह्या गोष्टी आवश्यक आहेत. त्याचा शरीराला व मनाला होणारा फायदा तर फारच महत्त्वाचा आहे. आज भारतातले अनेक कलावंत, विशेषत: चित्रातले, ध्यानाचा काडीचा अनुभव नसताना आध्यात्मिक चित्रे काढत असतात. ही एका अर्थाने ह्या कलांतील स्पिरीच्युअल मेडीओकर हिपोक्रसीच आहे. कलाशिक्षणात सर्व ध्यानपरंपरा समाविष्ट केल्या तर भारतीय परंपरा नीट उमगेल असं मला वाटतं.

आपल्याकडे एखाद्या वैज्ञानिकाला नंतर चित्रपटात रस निर्माण झाला किंवा चित्रपट कलावंताला डॉक्टर व्हावेसे वाटले तर त्याचे काय करायचे ह्या प्रश्नाचे उत्तर नाही. सध्या तात्पुरती एक गोष्ट आपण ह्याबाबतीत करायला हवी, ती म्हणजे सहा-सहा महिन्यांचे सृजनात्मक कोर्सेस चालू करणे. भौतिकशास्त्रापासून कवितेपर्यंत सर्व विषयांचे सहासहा महिन्याचे प्राथमिक वर्ग चालू केले तर त्याचा फायदा सर्वांनाच होईल असे वाटते. किमान त्या विषयांचे चांगले आस्वादक ह्यातून निर्माण होतील.

(११) ह्या सर्व सुधारणा प्रत्यक्षात याव्यात असे वाटत असेल तर आपणास महाविद्यालयांचे सध्याचे मॉडेलच पूर्णपणे बदलायला हवे. एकतर महाविद्यालयांचे व्यवस्थापन हे विद्यार्थी व शिक्षक ह्यांनी करायला हवे. महाविद्यालयातील सर्व कामे विद्यार्थ्यांनीच करायला हवीत. कलामहाविद्यालयांतील विद्यार्थ्यांनी स्वत:ची चित्रे, शिल्पे विकून नृत्य, नाटके सादर करून संकुलासाठी पैसा गोळा करायला हवा. घरांची इंटेरीयर डिझाईन्स करून द्यावीत. ह्या विद्यालयात शिकून मोठ्या झालेल्या कलावंतानी स्वतःच्या कलाकृती विकून महाविद्यालयाला त्यातील पैसा द्यावा. नृत्य, नाटक, चित्रपटवाल्यांनी व्यावसायिक धर्तीवर चित्रपट, नाटक, नृत्ये तयार करून त्यांच्या परफॉरमन्सवर पैसे कमवून द्यावेत. त्याचबरोबर युवागृहात चांगले खाण्याचे पदार्थ तयार करून त्यांच्या विक्रीतून पैसे कमवावेत. डॉक्युमेंटरी जाहिराती बनवूनही पैसा कमवून द्यावा. शासनाने कलाक्षेत्रातील सर्व कामे डॉक्युमेंटरी, जाहिरातीची कामे तसेच पुस्तकांच्या अनुवादांची कामे ह्या महाविद्यालयाकडे सोपवावीत व त्याबदल्यात त्यांना पैसा द्यावा. आज शासन एकतर्फी ग्रँट देते ती बरी न्हवे. शासनालाही विद्यार्थ्यांचा फायदा व्हायला हवा. अनुवादाची कित्येक कामे, त्यांच्या लेखनापासून प्रिंटिंगपर्यंत ह्या महाविद्यालयातील विद्यार्थ्यांकडून करून घेता येतील.

आणि शासनाचा खर्चही वाचेल. ह्यातून विद्यार्थ्यांना स्वावलंबनाचे धडे मिळतील. जी गोष्ट कला महाविद्यालयाची तीच विज्ञान महाविद्यालयाची. प्रत्येक मेडिकल कॉलेजचे स्वतंत्र हॉस्पिटल असावे किंवा इंजिनिअरिंग कॉलेज व तंत्रात्मक कोर्सवाल्यांचे स्वतःचे त्यांच्या अभ्यासक्रमाला पूरक असे कारखाने असायला हवेत. उदाहरणार्थ, शासनाची बांधकामाची सर्व कामे तज्ज्ञ लोकांच्या मार्गदर्शनाखाली सिव्हिल इंजिनिअरिंगच्या व आर्किटेक्चरच्या विद्यार्थ्यांनी करावीत. सर्व शासकीय इस्पितळे ही मेडिकल कॉलेजीसना जोडून द्यावीत. आज भारतात अशी स्थिती आहे की, इंजिनिअरिंग कॉलेजमधल्या साध्या सण्डासाचे बांधकाम देखील तिथले शिक्षक व विद्यार्थी करत नाहीत. हे जितक्या लवकर थांबेल तितके बरे. हीच गोष्ट मानव्यविज्ञानाबाबत. इलेक्शनच्या कामकाजात राज्यशास्त्राच्या विद्यार्थ्यांचा उपयोग स्वयंसेवक म्हणून व्हायला हवा. इतिहासाच्या विद्यार्थ्यांना उदा. अंजठा वेरुळच्या निगराणीचे व तिथे गाईड होण्याचे काम आळीपाळीने द्यायला हवे. शासकीय उत्खननात त्यांचा सहभाग हवा. किंवा विद्यालयाच्या उत्खननाच्या कार्यक्रमांना शासनाने अनुदान द्यावे. आज जगात इतरत्र विद्यार्थी काम करून शिकत असतो. भारतातील विद्यार्थी मात्र आईबापांच्या आणि शासनाच्या जिवावर चैन करत फावल्या गप्पा झोडत आळश्यासारखा हिंडत असतो. असा विद्यार्थी नागरिक झाल्यावर काय काम करणार ? विद्यार्थ्यांना कामचुकारपणाची सवय आपण विद्यार्थीदशेतच लावत असतो. त्यामुळे कामाचे त्यांना महत्त्वही कळत नाही आणि जे शिक्षण आपण घेतो ते किती महागडे आहे तेही कळत नाही. आपला बाप, आपली आई आपल्यासाठी किती खस्ता खातात ते आपल्याकडे लोकांना ते आईबाप झाल्यावरच कळते. सामाजीकरणाची प्रक्रिया आपल्याकडे शिक्षण संपल्यावर चालू होते. हे थांबवायचे असेल तर वर सांगितलेल्या गोष्टी करायलाच हव्यात. मानव्यशाखातील अर्थशास्त्र, व्यापारशास्त्र वगैरेच्या विद्यार्थ्यांना महाविद्यालयाने स्वतःची दुकाने चालवायला द्यावीत. महाविद्यालयातील मध्यवर्ती क्रीडांगणाबाहेर सुसज्ज गाळे बांधून तिथे दुकाने टाकणे अवघड नाही. आत क्रीडांगण आणि बाहेर दुकाने. आत सिद्धांतन आणि बाहेर प्रत्यक्ष कार्यशाळा हीच आधुनिक संस्कृतीची खरी शैक्षणिक प्रतीके आहेत. ह्या क्रीडांगणातच युवागृह उभे करून तिथे नृत्य, खाणे, सेमिनार, नाटक, चित्रपट वगैरे सर्व गोष्टी करता येतील.

(१२) शिकवण्याची पद्धत ही आपल्याकडील जुन्या गुरुकुल पद्धतीला धरून असावी. विद्यार्थ्यांना कुठल्याही वर्गात बसण्याची परवानगी असावी. इथे गुरूने बोलावे, शिष्याने ऐकावे.आजकाल वर्गात पाश्चात्त्यांची बसण्याची भंपक पद्धत आपण राबवतो आहोत. ती बदलून भारतीय बैठक चालू ठेवावी. गुरु मधे असावा व विद्यार्थी भोवताली बसावेत. लिखाणासाठी

भारतीयांची जुनी टेबल पद्धत राबवावी. कार्यशाळातून काही भारतीय व काही विदेशी कलावंत, उद्योगपती, खेळाडू, राजकारणी, शास्त्रज्ञ व मानव्यवैज्ञानिक बोलवावेत. गुरूने व्याख्याने देण्याऐवजी उपनिषदातील प्रश्न-उत्तर संवाद पद्धत राबवावी. ती अधिक चांगली आहे. अर्थात फळा वापरताना गुरु फळ्याकडे विद्यार्थी चौकोनी असे असावेत. गुरूने निरूपण करावे, शिष्यांनी प्रश्न विचारावेत. म्हणजे गुरू व शिष्यांचे नाते अधिक स्नेहाचे होईल. गुरूने शिष्यांशी चर्चा करावी. त्यांना ज्ञानाचे डोस पाजू नयेत, तर चर्चेतून ज्ञान उलगडून दाखवावे. तज्ज्ञांचे स्वतःचे परफॉरमन्स असावेत.

आपली सध्याची जी परीक्षा पद्धत आहे ती पूर्णपणे बदलावी. नववीपर्यंत गुण देऊ नयेत. फक्त ग्रेड द्यावी. १० वी ला बसायला सर्वांनाच परवानगी द्यावी. एखादा विद्यार्थी ५ वी नंतर एकदम १० वी ला बसू इच्छित असेल तर त्याला तशी अनुमती द्यावी. कला महाविद्यालयात तर महाविद्यालयीन पातळीवरही गुण देऊ नयेत. फक्त ग्रेडच असाव्यात. परीक्षा पद्धतीला फार थारा देऊ नये. १० वी ला मात्र शिष्यवर्गाची ॲप्टीट्यूड टेस्ट घ्यावी आणि सर्व विषयांची प्रश्नपत्रिका असावी. विद्यार्थ्याला मेडिकल किंवा इंजिनिअरिंग प्रवेश हा १२ वी नंतर द्यावा. मात्र हा प्रवेश १२ वी च्या गुणावर नव्हे तर मेडिकल एंट्रन्स किंवा इंजिनिअरिंग एंट्रन्स ह्या परीक्षानंतर असावा व ही परीक्षा सर्व राज्यांना एकच असावी. सर्वच ठिकाणी प्रवेश एंट्रन्स एक्झामनंतर द्यावा ते जास्त सोयीचे होईल.

आपले शिक्षण कसे असावे हे पाहिल्यानंतर आपणाला ह्या शिक्षणात भाषेचा रोल काय असावा ते पाहता येईल. शिक्षण देताना फक्त भाषेचा वापर करणे थांबवून चित्रपट, टीव्ही यांचा वापर करावा हे आपण पाहिले. मात्र तरीही शिक्षणाचे मुख्य माध्यम सध्यातरी भाषाच राहील असे दिसते. प्रथम भाषेचा विज्ञानशाखेच्या पातळीवर विचार करू.

विज्ञानाच्या शिक्षणाचा मुख्य कणा हा वैज्ञानिक विचार आहे. कुठलाही वैज्ञानिक हा तेव्हा चांगला वैज्ञानिक होऊ शकेल जेव्हा एखाद्या समस्येबाबत तो स्वतः विचार करू शकेल. विचार ही मुख्यतः भाषिक कृती आहे. विज्ञान हे अर्थनिर्णयनाला जास्त प्राधान्य देते आणि ही अर्थनिर्णयन करण्याची क्षमता कमावणे म्हणजेच भाषा शिकणे होय. कोणतेही मूल जेव्हा भाषा शिकते तेव्हा ते केवळ पोकळ स्वर किंवा व्यंजन किंवा व्याकरण शिकत नसते, तर संपूर्ण मानवी जीवनाची, अर्थनिर्णयनाची प्रक्रियाच आत्मसात करत असते. म्हणजेच ज्याला आपण वैज्ञानिक विचार म्हणत असतो, त्याची मूळ बीजे, मूळ पाया मुलाच्या भाषिक शिक्षणातच घातला जातो. याचाच अर्थ मुलाची वैचारिक क्षमता ते लहानपणी जी भाषा आत्मसात करते त्याच भाषेत सर्वाधिक प्रगट होते. किंबहुना स्वतंत्र विचार करण्याची त्याची क्षमता सर्वाधिक त्याच्या

मातृभाषेतच भरून येते हे एक अत्यंत उघडे-नागडे सत्य आहे. शिक्षण म्हणजे कसे शिकायचे ते शिकणे असेल तर भाषा हेच मानवाला मिळालेले महत्त्वाचे शिक्षण होय. ध्वनिभाषा, सौष्ठवभाषा व अर्थभाषा या तिन्ही भाषा मानव लहानपणीच शिकतो आणि आयुष्यभर शिकत राहतो. त्यामुळे आपणाला जर खरोखरच अस्सल वैज्ञानिक तयार करायचे असतील, अस्सल तंत्रज्ञ, डॉक्टर निर्माण करायचे असतील तर त्यांची वैचारिक क्षमता ते ज्या भाषेत वाढले त्या भाषेत त्यांना शिकवूनच वृद्धिंगत करायला हवी. याचाच अर्थ प्राथमिक व माध्यमिक शाळांत सर्व शिक्षण हे मातृभाषेतूनच झाले पाहिजे. आज इंग्रजी माध्यमात जी धडाधडा मुले टाकली जात आहेत त्यांना जरा हे ओरडून सांगणे आवश्यक आहे की, जगातले सर्वच वैज्ञानिक त्यांच्या त्यांच्या मातृभाषातूनच  विचार करतात. तुम्ही जेव्हा तुमची मुले इंग्रजी माध्यमात टाकता तेव्हा तुम्ही त्याच्यातील अस्सल वैज्ञानिक नष्ट करता. तुमची मुले इंग्रजी माध्यमात शिकून फारतर अमेरिकन वैज्ञानिक कारकून होतील. भविष्यात तेही  शक्य नाही. कारण इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्यांची संख्या प्रचंड वाढते आहे. ह्यातील फार थोडेजण अमेरिकेत जातील. मुळातच आज अमेरिकेत आशियाई लोकामुळे बेकारी वाढते आहे. त्याबद्दल तिथल्या तरुणांच्यात असंतोष वाढतो आहे. आज अनेकदा आशियाई लोकांवर तिथे बिनधास्त हल्ले होतायत. हे प्रमाण वाढत जाऊन तिथल्या लोकांनी बंदीची मागणी घातली तर आश्चर्य वाटावयास नको. जपानच्या मालाला बंदी आणण्याचे घाटत आहेच. हळूहळू माणसांनाही होईल. त्यामुळे फार जणांना भविष्यात तिकडे वाव नाही. उरलेले लोक इथे कारकून होतील; कारण साहेब होण्यासाठी जी वैचारिक क्षमता लागते ती इंग्रजी माध्यमातून मिळणे शक्य नाही. आज ज्यांच्या ताब्यात धंदा आहे ते सर्व लोक त्यांच्या त्यांच्या मातृभाषेतच शिकलेत. टाटांची मातृभाषा विदेशी आहे म्हणून ते त्या भाषेत व्यवहार करतात. तुमची मातृभाषा मराठी असेल तर तुम्ही त्यातच शिक्षण घ्यावे हे उत्तम. शालेय पातळीवर वैचारिक क्षमता तयार करणे हेच मुख्य कार्य असल्याने मातृभाषेत शिक्षण हेच महत्त्वाचे आहे.

महाविद्यालयीन पातळीवर मात्र शिक्षणाचा उद्देश बदलतो. इथे वैचारिक क्षमता तयार होऊनच विद्यार्थी आलेत हे गृहीत धरावे लागते. इथे उद्देश ह्या क्षमता वाढवणे हा असतो. ज्ञानाच्या कक्षा रुंदावण्याचा निश्चय  असतो. प्रश्न असा आहे की, इथे शिक्षणाचे माध्यम काय असावे ? विज्ञान हे मुळातच आंतरराष्ट्रीय असल्याने त्याला देशी भाषेच्या मर्यादा नसतात. किंवा देशी संस्कृतीच्याही मर्यादा नसतात. जगातील सर्व विज्ञान आज वेगवेगळ्या भाषांत उपलब्ध आहे. विज्ञानाबाबत मराठी भाषेत मात्र काहीही उपलब्ध नाही. मराठी भाषेत वैज्ञानिक ज्ञान उपलब्ध नसताना आपण काय करू शकतो ?

एकतर आपणाला जगातील सर्व विज्ञान मराठीत अनुवादित करावे लागेल किंवा ह्या सर्व भाषा शिकाव्या लागतील किंवा इंग्रजी ही वैज्ञानिक लिंग्वाफ्रँका म्हणून स्वीकारावी लागेल. ह्या तिन्ही पर्यायांचा आपण विचार करू.

आज ह्या घडीला जगात दरवर्षी किमान पाच लाख ग्रंथ प्रकाशित होतात. त्यातील विज्ञानाशी संबंधित चाळीस हजार असतात. ह्या चाळीस हजारांपैकी केवळ एक हजार ग्रंथ मूल्यवान मानले तरी दर वर्षाला एक हजार ग्रंथ अनुवादित करण्यासाठी लागणारे अनुवादक आपल्याकडे आहेत का ? हे सर्व ग्रंथ वेगवेगळ्या चाळीस भाषांत प्रकट होतात. ह्या चाळीस भाषा शिकवण्याची केंद्रे आपल्याकडे उपलब्ध होऊ शकतात का ? ह्या प्रश्नांचे ठाम उत्तर नाही असे आहे. दर वर्षाचे जाऊ द्या. गेल्या पाचशे वर्षातले महत्त्वाचे वैज्ञानिक ग्रंथ व पेपर आम्ही अनुवादित केलेले नाहीत. तेव्हा दरवर्षी हे ग्रंथ अनुवादित होतील वगैरे स्वप्ने आपण पाहू नयेत. तेवढे अनुवादक उपलब्ध नाहीत. भविष्यात ते होतील असे वाटत नाही. ह्याबाबतीत अनेकदा युक्तिवाद केला जातो की, तुम्हाला जर समजा इस्त्रायलमधले शेतीचे प्रयोग समजायचे असतील तर त्या भाषेतून ती पुस्तके अनुवादित करा. पण प्रश्न असा आहे की, त्यासाठी हिब्रू शिकणार कोण ? जगातील सर्वच भाषांतले विज्ञान इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, जपानी भाषेत अनुवादित होत असते. चाळीस भाषांची सर्वत्र केंद्रे उघडणे शक्य नसल्याने आपणाला ह्यातील एखादी भाषा शिकणे अटळ आहे आणि ह्या पाचही भाषांचा विचार करताना इंग्रजीच त्यातल्या त्यात अधिक योग्य वाटते. आणि जगानेही तिचा स्वीकार करायला प्रारंभ केलाय असे दिसते. दुसरी महत्त्वाची गोष्ट हे एखाद्याने अनुवादित केले तरी छापणार कोण ? ह्या पुस्तकांचा खप किती होणार ? ज्या भाषेत वॉर ॲण्ड पीसचे भाषांतर संपूर्ण करूनही कागदाचा आणि खर्चाचा विचार करून संक्षिप्त आवृत्ती काढावी लागते तिथे हे अनुवादीत ग्रंथ कुणी छापून प्रसिद्ध करतील ह्यावर विश्वास ठेवण्यात अर्थ नाही. आर्थिकदृष्ट्या एवढा कागद आयात करणे आपणाला शक्य नाही आणि हा अर्थव्यवहार प्रकाशकांना आणि शासनाला दोघांनाही परवडणारा नसल्याने ह्याबाबत कुणी उत्साह दाखवणे शक्य नाही. जी गोष्ट अनुवादकांबाबत आहे तीच वाचकांबाबत आहे. प्रत्येक वाचकाने किती भाषा शिकायच्या ह्याला मर्यादा असतात. इस्त्रायलमधले प्रयोग कळावेत म्हणून आपला शेतकरी हिब्रू शिकेल हा विचार युरोपियन आहे. तेव्हा तो किती भाषा शिकेल आणि त्याने कोणती भाषा शिकावी ? जिथे फ्रेंच, जर्मन शिकतानाही त्या इंग्रजी माध्यमात शिकाव्या लागतात तिथे इंग्रजी कशी टाळता येईल ? तेव्हा सर्वसामान्य माणूस काही भाषा शिकायला जन्मलेला नाही. त्याला व्यवहार पहायचा असतो. त्या दृष्टीनेही आपल्या भारतीय माणसाने इंग्रजी भाषाच

विदेशी भाषा म्हणून शिकावी असे वाटते. कारण त्याशिवाय पर्याय नाही. आज जपान, रशिया वगैरे देशांनीही जगात होऊ घातलेला हा बदल स्वीकारायला सुरुवात केलीये. आपणही इंग्रजी ही ग्लोबल लिंग्वाफ्रँका आहे हे सत्य शांतपणे स्वीकारावे हे उत्तम.

भाषेबाबतचा दुसरा मुद्दा आहे ज्ञानाच्या वेगाचा. मी मागेच सांगितले की गेल्या पन्नास वर्षात जे ज्ञान प्राप्त झाले त्याच्या दुप्पट ज्ञान ह्या पाच वर्षात मिळते आहे. ज्ञानाच्या ह्या अफाट वेगाला तुम्ही कसे पुरे पडणार आहात ? तुमच्या पुस्तकाचा अनुवाद होऊन ते प्रकाशित होईपर्यंत जग त्या क्षेत्राबाबत आणखी पुढे गेलेले असते. त्यामुळे हे अनुवाद आणि त्यातील ज्ञान हे जुनाटच ठरतात. ही वस्तुस्थिती लक्षात घेतली म्हणजे भारतात व महाराष्ट्रात इंग्रजीशिवाय पर्याय नाही हे स्पष्ट होईल. समकालीन विज्ञानाशी ज्यांना संवाद ठेवायचा आहे त्यांना इंग्रजी अपरिहार्य आहे.

वरील सर्व विवेचनावरून विज्ञान शाखेत महाविद्यालयीन पातळीवर इंग्रजी अपरिहार्य आहे हे सहज समजून येईल. त्यामुळे महाविद्यालयीन पातळीवर विज्ञान शाखेबाबत इंग्रजी माध्यम अपरिहार्य आहे, ही वस्तुस्थिती लक्षात घेतली म्हणजे शालेय जीवनात इंग्रजीची तयारी करून घेणे अपरिहार्य आहे हे सहज लक्षात येईल.

आज भारतात इंग्रजी माध्यमातील शाळांचा जो प्रश्न आहे तो खरोखरच माध्यमाचा आहे की व्यवस्थेचा ? माझ्या मते हा प्रश्न व्यवस्थेचा आहे. आज भारतात इंग्रजी माध्यमात मुलांना पाठवण्याची जी कारणे आहेत ती पुढीलप्रमाणे :

(१) सर्वात महत्त्वाचे कारण मराठी शाळांचे अपयश. आज मराठी शाळेत इंग्रजी शिकवले जाते हे वाक्य विनोदी आहे. आपल्या मराठी शाळा मुलांना इंग्रजी शिकवण्यात पूर्णपणे अपयशी ठरल्या. पाच पाच वर्षे अभ्यास करून जर मुलाला धड एक इंग्रजी वाक्य बोलता येत नसेल तर आईबापांनी मराठी शाळांवर कसा विश्वास ठेवायचा ? वैज्ञानिक क्षेत्रात इंग्रजी अपरिहार्य आहे हे कळलेला वर्ग आज निमूटपणे आपल्या पाल्यांना इंग्रजी माध्यमात पाठवतो आहे. हे चित्र जर बदलायचे असेल तर आपणाला मराठी शाळांतील इंग्रजी शिक्षणाचा दर्जा सुधारावा लागेल. ज्या दिवशी मराठी शाळेतील दहावी शिकून बाहेर आलेला विद्यार्थी हा इंग्रजी शाळेतील दहावी शिकून आलेल्या विद्यार्थ्यांशी तितक्याच आत्मविश्वासाने बोलायला लागेल त्या दिवशी ह्या देशातून इंग्रजी माध्यमाच्या शाळा आपोआप गायब होतील; पण आपण मुळात सुधारणा करण्याऐवजी भलत्याच ठिकाणी लक्ष केंद्रित करत आहोत. प्रथम आपणाला त्यासाठी खालील सुधारणा करायला

हव्यात.

(अ) भाषा ही प्रथम बोलायला शिकायची असते हे लक्षात घेऊन रोमन लिपीच्या एबीसीडी पासून सुरुवात करण्याऐवजी संभाषणात्मक इंग्रजी शिकवायला सुरुवात करावी. ही सुरुवात इयत्ता तिसरीपासून करावी. तिसरी, चौथी दोन वर्षात छापील इंग्रजी पुस्तक पोरांना उघडायला लावू नये. उच्चार सरळ देवनागरी लिपीत लिहून दाखवावेत. इंग्रजी लिपीमुळे मुलांच्यात उगाचच भय निर्माण होते ते जाऊन मुले इंग्रजीत तोडकी-मोडकी संभाषणात्मक वाक्ये बोलायला लागली की मगच रोमन लिपीला हात घालावा. ह्या काळात इंग्रजीची परीक्षा ठेवू नये. फक्त तोंडी परीक्षा असावी. प्रत्येक मुलांच्या इंग्रजीकडे लक्ष राहावे असे वाटत असेल तर तुकड्यांची आणि शाळांची संख्या त्याचबरोबर शिक्षकांची संख्या जवळ जवळ दुप्पट होणे आवश्यक आहे. ह्याबाबत शासन जी अक्षम्य ढिलाई दाखवत आहे ती निषेधार्ह आहे. येऊ घातलेल्या पिढ्यांची नासाडी करून आपण कोणत्या प्रकारचा देश घडवणार आहोत राम जाणे ! केवळ इंग्रजीच नव्हे तर सर्वच विषयांबाबत संख्येत वाढ होणे आवश्यक आहे. तिसरी चौर्थीतच चार इंग्रजी चित्रपटांची ओळख द्यावी आणि त्या चित्रपटाचे संवाद देवनागरी लिपीत लिहून ते पाठ करून घ्यावेत. पाच वर्षानंतर दरवर्षी इंग्रजी विषयात इंग्रजी चित्रपटांचा समावेश असावा. इंग्रजी मराठीतून शिकवावी.

(ब) पाचवी ते सातवी भर संभाषणात्मक हवा. ह्या काळात बालवाङ्मयाचाच वापर हवा आणि परीक्षा तोंडी आणि काही प्रमाणात लेखी असावी. आठवी ते दहावी विज्ञानक्षेत्रावर आधारित धडे प्रामुख्याने असायला हवेत. आठवी ते दहावी ह्या काळात इंग्रजीतून भाषणे लिहायला सांगून ती प्रत्येक विद्यार्थ्याला वर्गामध्ये करायला हवीत. विषय अर्थात साधे हवेत. ह्यासाठी धड्यावर उगाच भर देण्यापेक्षा वर्षातून प्रत्येक विद्यार्थ्याला तीन भाषणे करायला लावणे सक्तीचे करावे. चाचणीची ग्रेड त्यावर ठेवावी. नाटके बसवताना ती मराठी आणि इंग्रजी भाषातून बसवून घ्यावीत. किंबहुना त्याची सक्तीच करावी. पाचवी ते दहावी व्याकरण करून घ्यावे .पण ते घेताना नियम मराठीत छापावेत आणि मराठीतून शिकवावेत फक्त नामाऐवजी नाऊन वगैरे शब्द इंग्रजीत ठेवावेत. आज शाळात काही इंग्रजी आणि मराठी अशा दोन्ही भाषांत शिकवावे. आपल्या इंग्रजीच्या काही शिक्षकांना आपले इंग्रजी लहान पोरांपुढे पाजळणे उगाच गरजेचे वाटते. इंग्रजीची सर्व टेक्स्ट ही एका बाजूला देवनागरी व दुसऱ्या बाजूला रोमन लिपीत छापावीत त्यामुळे इंग्रजीचे भय कमी होईल व मुलांना इंग्रजी सोपे जाईल.

(क) विज्ञानाच्या पुस्तकात ज्या टर्मस असतात त्यांना अवघड प्रतिशब्द देण्याचा प्रकार आपण ताबडतोब बंद करावा आणि मूळ इंग्रजी शब्दच वापरावेत व तेच मराठी भाषेत रुढ

करावेत. वेग ह्या शब्दाऐवजी स्पीड हा शब्द अधिक रूढ होत आहे, तर तो तसाच रूढ करावा. हा परिभाषेचा तमाशा भरपूर झाला. एकतर ते शिकून विज्ञानाच्या विद्यार्थ्यांला तसा काहीच फायदा नसतो. त्याला पुढे इंग्रजी शब्द शिकावेच लागतात आणि हे विद्यार्थी मूळचा मराठी शब्द आपोआपच विसरतात. तेव्हा प्रथम तो शब्द त्यांच्या मनात लिहायचा आणि नंतर आपणच तो पुसायचा त्यापेक्षा मूळ इंग्रजी शब्द तसाच ठेवावा. भाषेची शुद्धी हा एक बकवास प्रकार आहे. ती अस्तित्वात नसलेली गोष्ट आहे. तेव्हा तिच्या मागे लागू नये. इंग्रजी शब्द मराठीत रूढ करावेत. त्वरणापेक्षा ॲक्सिलरेशन आणि आवाजापेक्षा व्हॉल्युम हेच शब्द टीव्ही संस्कृतीत रूढ होणार आहेत. तेव्हा ही इंग्रजी टर्मिनॉलॉजी शिकण्यात जो बौद्धिक अपव्यय होतो तो त्यामुळे टळेल.

(ड) आज इंग्रजी माध्यमाचे खूळ वाढण्याचे एक मोठे कारण म्हणजे इंजिनिअरिंगला व मेडिकलला जी बारावी बोर्डाची परीक्षा असते ती इंग्रजीतून द्यावी लागते. एका अर्थाने ही परीक्षा इंजिनिअरिंग व मेडिकलची एन्ट्रस एक्झामच असते. आमची मराठी माध्यमातील पोरं जेव्हा अकरावीला जातात तेव्हा त्यांच्यासमोर धाडकन् इंग्रजी भाषा येते. परिणामी अनेकांना पहिले सहा महिने वर्गात काय चाललेय तेच कळत नाही. अनेकांचा स्वतःवरचा विश्वासच उडतो. त्यातील कित्येकांना विज्ञानात जबरदस्त गती असते, पण भाषिक प्रश्न आडवा येतो आणि ही मुले विज्ञान कठीण समजतात. कारण ह्या मुलांचा आकलनावर भर असतो. पाठांतरावर नसतो. ही मुले केवळ ह्या इंग्रजीच्या वरवंट्याखाली येऊन मेडिकल, इंजिनिअरिंग किंवा तत्सम ॲडमिशनला पारखी होतात आणि केवळ पाठांतर करून विज्ञानाची घोकंपट्टी करणारे लोक परीक्षेत तथाकथित पैकीच्या पैकी मार्क्स मिळवून पुढे मेडिकल वगैरेला जातात. म्हणजे जे अस्सल विज्ञाननिष्ठ व लायक असतात ते मागे राहतात आणि पाठांतराचे पोपट पुढे जातात. हे लोक पुढे ग्रेची ॲनाटॉमी घोकत घोकत डॉक्टर होतात आणि नंतर समाजाच्या आरोग्याचा सत्यानाश करतात. विज्ञानक्षेत्रातील ही प्रतिभेची नासाडी थांबवायची असेल तर अकरावी-बारावीला मराठी माध्यम सक्तीचे करावे व ह्या दोन वर्षात इंग्रजी भाषेची विज्ञानासाठी आवश्यक असणारी जोरदार तयारी करून घ्यावी. ह्या दोन वर्षात इंग्रजी विषयाच्या नावाखाली जे इंग्रजी साहित्य शिकविले जाते ते पूर्ण बंद करावे. आपल्याकडे काही ठिकाणी अद्यापही कला, विज्ञान, वाणिज्य या तिन्ही शाखांना मराठी व इंग्रजीचा एकच अभ्यासक्रम असतो, हा शुद्ध गाढवपणा आहे. प्रत्येक शाखेची भाषिक गरज वेगळी आहे आणि ती ओळखून आपण प्रत्येक शाखेचा अभ्यासक्रम तयार करायला हवा. विज्ञान शाखेला अकरावी-बारावीला इंग्रजी साहित्याची काडीचीही गरज नाही. तिथे वैज्ञानिक

विषयावरचे निबंधच टेक्स्ट बुकात असावेत आणि विद्यार्थ्यांना ते शिकवताना त्यामागचे उद्दिष्ट सांगून ते शिकवावेत. अकरावी-बारावीला जे विज्ञान असते त्याला जोडूनच हे निबंधाचे विषय असावेत आणि सविस्तर उत्तरे विद्यार्थ्यांकडून लिहून घ्यावीत. 'एका ओळीत उत्तरे लिहा.' सारखे प्रश्न अजिबात टाकू नयेत. सर्व प्रश्न सविस्तरच असावेत. उरले-सुरले व्याकरण ह्या दोन वर्षात उजळणीसह शिकवून तयार करून घ्यावे. जेणेकरून विद्यार्थी कुठेही गेला तरी इंग्रजीतील व्याख्याने त्याच्या पचनी पडावीत आणि विज्ञान शाखेचा वैचारिक पाया पक्का व्हावा. या वर्षी कलाविषयांत मात्र चित्रपट, नाटक, संगीत, नृत्य आणि साहित्य या संदर्भातील माहितीपूर्ण लेखन व प्रात्यक्षिके समाविष्ट असावीत, तसेच सर्व कलांचा रसास्वाद असावा. थोडक्यात, इंग्रजी वाङ्मयाऐवजी संभाषणात्मक व लिखित इंग्रजीची तयारी आणि मराठी साहित्य या विषयाऐवजी कला हा विषय असावा. इंग्रजी हा विषय शिकताना विज्ञान आणि समाज यांचे संबंध स्पष्ट करणारे तीन निबंधही समाविष्ट करावेत. अर्थात इथेही टेक्स्ट बुकात परिभाषा वापरण्याच्या फंदात पडू नये. बॉटनीला बॉटनीच म्हणावे, मॅथ्यॅमेटिक्सला मॅथ्यॅमेटिक्सच म्हणावे. तसेच प्राण्यांची, अवयवांची, केमिकल्स वगैरेंची नावे इंग्रजीतीलच ठेवावीत. अर्थवर्मला अर्थवर्म, फ्रॉगला फ्रॉग म्हणावे व कंसात बेडूक आणि गांडूळ असे मराठी शब्द छापावेत. इथे विज्ञान विषयांची टेक्स्टबुके एका बाजूला मराठीत तर दुसऱ्या बाजूला अनुवादित इंग्रजीत छापावीत. त्यामुळे इंग्रजीचा अधिक सराव होईल.

आज बारावी संपली की विज्ञान व तंत्रज्ञानाच्या विद्यार्थ्यांचा कलांशी आणि मानव्यशाखांशी संबंध पूर्णपणे संपतो. हा संबंध तोडणे भारतात तरी अजिबात परवडणार नाही. जिथे आधुनिक कलासंस्कृती व मानव्यविज्ञान संस्कृती अद्याप विकसित झालेली नाही तिथे ही चैन परवडणार नाही. डॉक्टर्स व इंजिनिअर्सना ह्या शाखांतील गोष्टी आपोआप कळतील हा भ्रम आपण जितक्या लवकर फेकू तितके चांगले. आज आपण सर्वांना विज्ञान कळणे आवश्यक मानतो. पण कला कळणे मात्र आवश्यक मानत नाही. हे एकांगी आहे. युवागृहांची स्थापना ह्या महाविद्यालयांत हवीच, त्याचबरोबर इथे कला व मानव्यविज्ञानाचा एक पेपर सर्वांना सक्तीचा हवा. मात्र ह्या विषयाला मार्क्स देऊ नयेत, तर केवळ ग्रेड द्यावी. इथे विज्ञानाचे अर्थशास्त्र, विज्ञानाचे समाजशास्त्र, विज्ञानाचे राज्यशास्त्र ह्या अनुषंगाने टेक्स्टबुक तयार करणे आवश्यक आहे. कलेत कलाविषयाचा अधिक विकसित अभ्यासक्रम असायला हवा. हा पेपर मात्र मराठीतच हवा; कारण कलेला परकीय भाषेच्या माध्यमाची गरज नाही. ह्यामुळे एकाचवेळी मातृभाषेशी आणि मातृभाषेतील संस्कृतीशी आणि सामाजिक प्रश्नांशी विद्यार्थ्यांची नाळ टिकून राहील. फक्त शेवटच्या वर्षी हा पेपर असू नये. बाकीची वर्षे ह्या पेपरमधून विद्यार्थ्यांची नाळ समाजाशी व ह्या विश्वातील समस्यांशी

घट्ट राहील हे पाहिले पाहिजे.

थोडक्यात, विज्ञानशाखेत शालेय पातळीवर मातृभाषा हेच माध्यम असावे. ज्युनियर कॉलेजला मातृभाषेची व इंग्रजीची तयारी तर सीनियर कॉलेजला इंग्रजी माध्यम आपण स्वीकारले पाहिजे. ह्याचबरोबर कला व मानव्यविज्ञानाची मध्यम ओळख करून देणे आपण स्वीकारले पाहिजे व ह्या विषयांचे माध्यम मातृभाषा असायला हवी. ह्याचा एक फायदा असा होईल की, कलेला आश्रय देणारा वर्ग ह्यातून आपोआप तयार होईल; कारण भारतात तरी ज्यांच्याकडे पैसा व थोडा फावला वेळ असणारा जो वर्ग आहे तो ह्या विज्ञान शाखांचाच विद्यार्थी असतो. आजतरी हा वर्ग भारतातल्या अडाणी शैक्षणिक धोरणामुळे कलेच्या आनंदाला व सामाजिक बांधिलकीला पारखा झाला आहे. त्याला जर ह्या दोन्ही गोष्टी प्राप्त व्हाव्यात असे वाटत असेल तर वर दिल्याप्रमाणे त्याची नाळ जोडली जाणे आवश्यक आहे. हा वर्ग मुळातच समाजाची बौद्धिक साय असल्याने त्याला ही मध्यम ओळख झाली तरी पुरेशी आहे. अलीकडे युक्रांदपासून अंधःश्रद्धा निर्मूलन चळवळीपर्यंत ज्या तरुणांच्या चळवळी झाल्या तिथले कित्येक नेते हे पवईतून आलेले किंवा डॉक्टर असलेले असे वैज्ञानिक पदवीधर आहेत. दुर्दैवाने ह्यातील कुणीच शिक्षणाविषयी मूलभूत चळवळ उभी केली नाही. त्यातच हे लोक मार्क्सच्या प्रभावाखाली आंदोलन करत होते. ह्या दोन गोष्टींमुळे ह्यांच्या प्रयत्नांना पुरेसे यश मिळालेले दिसत नाही. मात्र हा वर्ग जागृत राहिला तर काय होईल ह्याची चुणूक मात्र त्यांनी निश्चितच दाखवली आहे. ह्या चळवळीतल्या लोकांचे आणि देशी चळवळीतल्या चित्रे, नेमाडे वगैरेंचे फारसे सांस्कृतिक संबंध निर्माण झाले नाहीत ही गोष्ट ह्या दोन गोष्टी किती तुटल्यात ह्याचीच निदर्शक आहे. वेगळेपणाचा सोस किती महागात पडू शकेल त्याचा हा प्रत्यक्ष पुरावा मानायला हरकत नाही.

विज्ञानशाखेत भाषाधोरण ठरवताना ज्या गोष्टी आपण पाहिल्या त्याच पार्श्वभूमीवर आपण मानव्यविद्येबाबतचे भाषाधोरण सहज ठरवू शकू. विज्ञान ही मुळातच आंतरराष्ट्रीय व देशीयतेच्या पूर्ण पलीकडची बाब असल्याने तिच्याबाबत विचार करताना आपण आंतरराष्ट्रीयत्वाचा पूर्ण स्वीकार करून इंग्रजी ही ग्लोबल लिंग्वाफ्रँका असल्याचे मान्य केले आणि महाविद्यालयीन पातळीवर इंग्रजी माध्यमाचा पूर्ण स्वीकार केला. मानव्यशाखांबाबत थोडी वेगळी स्थिती असते. मानव्यशाखांतील वैज्ञानिकाला व तंत्रज्ञाला इथल्या मानवाच्या प्रश्नांशी निगडित राहून इथल्याच मानवाचे प्रश्न सोडवायचे असतात. भारतीय मानव्यवैज्ञानिकाला आंतरराष्ट्रीय संदर्भात भारतात राहणाऱ्या मानवाचे प्रश्न सोडवायचे असतात. भारतीय अर्थशास्त्रज्ञाला भारतीय माणसासाठी अर्थव्यवस्था कशी उभी करायची ते पाहायचे असते. भारतीय भांडवलदाराला जगाच्या संदर्भात

भारतातच माल तयार करून तो मोठ्या प्रमाणात भारतात व नंतर भारताबाहेर खपवायचा असतो. त्यामुळेच त्याला आंतरराष्ट्रीय मार्केटसाठी इंग्रजी, भारतीय मार्केटसाठी हिंदी आणि स्थानिक मार्केटसाठी तिथली भाषा ही आत्मसात करावी लागते. आंतरराष्ट्रीय मार्केटसाठी कामचलाव इंग्रजी, भारतीय मार्केटसाठी बरे हिंदी आणि स्थानिक मार्केटसाठी उत्तम स्थानिक भाषा ही यावी लागते. राजकारण, समाजकारण ह्यासाठी हीच गोष्ट लागू आहे. राज्यशास्त्र, समाजशास्त्र वगैरे मानव्यवैज्ञानिकांना इथल्याच माणसांचे प्रश्न सोडवायचे आहेत हे हल्ली त्यांना सांगायची पाळी यावी इतके हे लोक युरोपाळलेले आहेत. एकीकडे आंतरराष्ट्रीय वैश्य व दलित जाणिवेचा पुरस्कार करत करत त्यांना लोकल कंडीशनिंगचा अभ्यास करून इथल्या मानवाचे इंजिनिअरिंग करायचे आहे. आज आमचे राजकारणी व प्रशासन ह्याबाबत ह्या लोकांचे काही साहाय्य व सल्ला न घेता हवेत वार करून प्रश्न सोडवते हे बरे नव्हे. समाजकारण करणाऱ्यांना समाजशास्त्र कळत नाही आणि समाजशास्त्र कळणाऱ्यांना समाजकारण करायचे नाही असा हा पेच आहे. तो सोडवायचा असेल तर मागे सुचवलेले शैक्षणिक बदल प्रथम कार्यान्वित व्हायला हवेत.

आज आपण राष्ट्रभाषा हिंदी शिकतो; पण ती ज्यासाठी शिकायची त्यासाठी मात्र शिकवली जात नाही. हिंदी शिकण्याचा आपला मुख्य उद्देश हा मानव्य विज्ञान शिकणे हाच असला पाहिजे. हिंदीत वैज्ञानिक वाङ्मयाचा ठणठणाट आहे. त्यामुळे तिचा वैज्ञानिक भाषा म्हणून विचार करण्यात अर्थ नाही; पण भारतीय समाजात नेमक्या काय उलथापालथी चालल्यात ते कळायचे असेल तर मात्र हिंदीशिवाय पर्याय नाही. आपली राजकीय मॉडेल्स, सामाजिक मॉडेल्स तयार करताना युरोपियनांची अंधळी उसनवारी करण्यापेक्षा वैज्ञानिक दृष्टिकोनातून आपल्या समाजाचा अभ्यास करून त्यातून आपली मॉडेल्स तयार करायला हवीत. ही मॉडेल्स तयार करताना युरोपियन सिद्धांतावरील शास्त्रीय वाटणाऱ्या बाबींचा जरूर वापर करावा; पण आपला समाज हा आपला समाज आहे ह्याचे भान राखावे. तथाकथित देशीयता आणि आंतराष्ट्रीयतेच्या नावाखाली चालणारा युरोपियन भोंगळपणा ह्या दोन्ही गोष्टी आपण थांबवायला हव्यात. हे करायचे असेल तर भाषिक पातळीवर तीन भाषा शिकणे अटळ आहे. पहिली मराठी, दुसरी हिंदी आणि तिसरी इंग्रजी. आपणाला अनेकदा फ्रान्समध्ये काय घडले हे माहीत असते, पण शेजारच्या कर्नाटकात कोणते राज्यशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ आहेत त्याची कल्पना नसते. हिंदीवाल्यांचा सर्वांत मोठा दोष म्हणजे दक्षिण भारताबाबतची त्यांची उदासीनता. अलीकडे हिंदीवाल्यांनी ही गोष्ट ओळखून कसर भरून काढायाला सुरुवात केलीये ;पण त्यांचे काम मंदगतीने चालले आहे. हा वेग परवडणारा नाही. तो वाढायलाच हवा. आपल्या मानव्यशास्त्रज्ञांनीही इंग्रजीतून पुस्तके लिहिण्यापेक्षा आपल्या

मातृभाषेत किंवा हिंदीत लिहावीत. फुलनदेवीबद्दल किंवा वारली समाजाबद्दल इंग्रजीत लिहून तुम्ही काय साधणार ? फुलनदेवीचा किंवा वारल्यांचा प्रश्न इथला आहे; तेव्हा तो इथल्या लोकांपर्यंत पोहचवा. इंग्रजीतून ह्या प्रश्नावर लिहून तुम्ही फारतर त्यांची करमणूक कराल. पहा इंडियात कशी अजून डाकूगिरी चालते हे म्हणायला ते लोक मोकळे ! त्यातून तुमचे प्रश्न काय सुटणार ? हां, तुम्हाला जर इथल्या अभ्यासातून पूर्णपणे नवीन सिद्धांतन सुचले तर मात्र ते जरूर इंग्रजीत अनुवादित करा. त्यांनाही त्याचा उपयोग होईल. मात्र हे सिद्धांतनही प्रथम इथल्या लोकांसाठीच असायला हवे. महाराष्ट्रातील वारल्यांच्या अभ्यासाचा जेवढा फायदा हिंदी किंवा कर्नाटकातील समाजशास्त्रज्ञाला होईल तेवढा युरोपियनांना निश्चितच होणार नाही. चंबळच्या खोऱ्यातील डाकूंत असलेल्या जातिव्यवस्थेचा अभ्यास हा केव्हाही महाराष्ट्रातील समाजशास्त्रज्ञाला जास्त उपयोगी आहे हे भान आपणाला येत नाही तोपर्यंत मानव्य विज्ञानात आपण जगाला फार काही मोठे योगदान देऊ असे वाटत नाही. काहींनी तिथला आणि इथला असा तुलनात्मक अभ्यास करावा. ह्याचा फायदा त्यांनाही होईल आणि आम्हालाही होईल. असो.

मानव्यवैज्ञानिकांनी नेमके काय केले पाहिजे हे लक्षात घेतले म्हणजे ह्या शाखेचा भाषिक प्रश्न सोडवणे सोपे जाईल. मानव्य वैज्ञानिकांना इथले प्रश्न सोडवायचे असल्याने त्यांनी इथली वस्तूस्थिती डोळसपणे पाहणे आवश्यक आहे.

आज शालेय पातळीवर मानव्य विज्ञानाची ओळख ही इतिहास, भूगोल, नागरिकशास्त्र आणि क्वचित काही ठिकाणी अर्थशास्त्र ह्या विषयांद्वारे होते. ह्यातील नागरिकशास्त्रामुळे राज्यशास्त्र हा विषय विद्यार्थ्यांच्या कक्षेत येतो. ह्या सर्व व्यवहारात अर्थशास्त्र व समाजशास्त्र ही महत्त्वाची दोन शास्त्रे सुटून जातात. विशेषतः सर्व समाज व त्याची मूल्ये ही अनेकदा अर्थप्रधान असताना अर्थशास्त्राची ओळख केवळ वाणिज्य शाखेत प्रवेश घेतल्यानंतर व्हावी आणि ही ओळखही ऐच्छिक असावी हे चित्र प्रचंड असमाधानकारक आहे. जातिव्यवस्थेसारखा प्रश्न केवळ इतिहासातून, वीरपुरुषांच्या चरित्रातून पोहचवणे हेही अपुरे वाटते. आपणाला ह्यासाठी थोडे सजग होऊन अभ्यासक्रम बदलावा लागेल. मुलांच्यावर सहा सहा मानव्यविज्ञानांचा भार टाकणे उचित नाही; पण आपणाला इथे एक गोष्ट निश्चितच करता येईल, ती म्हणजे या तीन मानव्यविज्ञानांतून उरलेली तीन मानव्यविज्ञाने परिचित करून देणे. इतिहासातून समाजशास्त्र, भूगोलातून अर्थशास्त्र आणि नागरिकशास्त्रातून राज्यशास्त्र असा परिचय करून देणे हे अत्यंत आवश्यक आहे. नागरिक घडवण्याचे खरे काम मानव्यविज्ञान करत असल्याने हा विचार अधिक गांभीर्याने करणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ, इतिहासातून राजा राममोहन रॉय यांचे कार्य सांगताना

सती प्रथेमागची हिंदू समाजव्यवस्था व मानसिकता सांगायला हवी. आगरकर-टिळक ह्यांच्या परिचयाबरोबर त्यांच्यातला वैचारिक वाद ठळकपणे समोर यायला हवा. महर्षि कर्वेंच्या कार्याबरोबर शिक्षणशास्त्रातील काही सिद्धांतनांचा समावेश सोप्या भाषेत यायला हवा. र. धों. कर्वे यांच्या कार्याचा परिचय मोठ्या प्रमाणात होणे आवश्यक आहे. त्यानिमित्ताने भारतातील लोकसंख्येचा प्रश्न मांडायला हवा. महात्मा गांधींसंदर्भात दारूची समस्या चर्चिली पाहिजे. दारूमुळे किती कामगारांची आयुष्ये, किती घरे आणि किती संसार बरबाद झाले हे स्पष्टपणे सांगितले पाहिजे. दारू सोडण्यासाठीचे व दारू सोडवण्यासाठीचे उपाय तिथे सांगितले गेले पाहिजेत. महात्मा फुल्यांच्या कार्याबरोबर आजची स्त्रीमुक्ती चळवळ जोडून घ्यायला हवी आणि जातिव्यवस्थेचे सर्वंकष स्वरूप सांगायला हवे. जातिव्यवस्थेचे घातक परिणाम समजवायला हवेत. रशियन राज्यक्रांती वा जर्मनीचे एकीकरण ह्या बाबींपेक्षा ह्या गोष्टी महत्त्वाच्या आहेत. ५ वी ते १० वी ह्या सहा वर्षात परिशिष्टात दरवर्षी सहा राज्यांचा इतिहास वाचनपुरवणी म्हणून टाकायला हवा. वगैरे वगैरे. भूगोल शिकवताना महाराष्ट्राच्या भूगोलाबरोबर महाराष्ट्राची अर्थव्यवस्था समजावून सांगितली पाहिजे. जमीन, जमिनीचे प्रकार, तिथे असलेल्या आधुनिक शेतीच्या शक्यता, निघू शकणारी पिके, त्यांच्या निर्यातीच्या जागा आणि बाजारपेठा, त्यांच्या मागणीमागची कारणे ह्या सर्व गोष्टी अधिक तपशीलवार येणे आवश्यक आहे. हीच गोष्ट कारखानदारीबाबत ! त्यामागचे अर्थशास्त्र सुबोध भाषेत सांगावे लागेल आणि त्याचबरोबर पर्यावरणाचे प्रश्नही मांडता यायला हवेत. नागरिकशास्त्रात फक्त प्रशासन-व्यवस्थेवर जो अतिरेकी भर दिला आहे तो कमी करून नागरिकांच्या हक्कांवर व कर्तव्यांवर भर दिला पाहिजे. मुख्य म्हणजे शासनसंस्था ही नागरिकांची नोकर असते आणि तिच्यावर अंकुश ठेवणे हे नागरिकाचे कर्तव्य आहे हे बिंबवले पाहिजे. ह्यासाठी नागरिकांनी वेगवेगळ्या ठिकाणी दिलेल्या लढ्यांचा त्रोटक परिचय करून देणे आवश्यक आहे. भारतीय स्वातंत्र्यलढ्यांपेक्षा नागरिकांचे हक्कासाठी दिलेले लढे हे समकालीन संदर्भात जास्त महत्त्वाचे आहेत. लोकशाही कशा पद्धतीने भ्रष्ट होऊ शकते ते ह्याच वयात सांगून तिला भ्रष्ट होण्यापासून कसे वाचवता येते तेही ह्याच वयात सांगितले पाहिजे.

आपल्याकडे गणित, विज्ञान, इंग्रजी शिकवणाऱ्या शिक्षकांना कारण नसताना जो अधिक मानसन्मान मिळतो तो थांबवायला पाहिजे. मानव्यविज्ञानाच्या शिक्षकांवरच नागरिक घडविण्याची जबाबदारी असते हे त्याने लक्षात घ्यावे. बहुतांश विद्यार्थी शिक्षण संपल्यानंतर गणित आणि विज्ञान विसरून जातात, पण रोजच्या दैनंदिन जीवनात मात्र त्याला राजकारण, समाजकारण आणि अर्थकारण ह्यांना तोंड द्यावे लागते. तेव्हा एका अर्थाने मानव्यविज्ञानाचा शिक्षक विद्यार्थ्याला

तो आयुष्यभर लक्षात ठेवेल असे संस्कार देऊ शकतो हे त्याने लक्षात घ्यावे. गणित आणि विज्ञानाइतकीच ही कामगिरी मोलाची आहे.

शालेय पातळीवर 'शिक्षण', कसे शिकायचे आणि का शिकायचे हे बिंबवत असते. उदाहरणार्थ, विचार कसा करायचा आणि का करायचा. ११ वी, १२ वी ला शिक्षण, काय शिकायचे ते बिंबवते. उदाहरणार्थ, कोणकोणती क्षेत्रे त्या विषयात आहेत त्यांचा परिचय आणि महाविद्यालयीन पातळीवर प्रत्यक्षात ती शिकायची प्रक्रिया पार पाडली जाते. मानव्यविज्ञान ह्याला अपवाद नाही.

विज्ञानशाखेची चर्चा करताना आपण विज्ञान शिकताना मातृभाषेचे माध्यम का आवश्यक आहे ते पाहिले होते. त्याच कारणासाठी मानव्यविज्ञान शाखेतही मातृभाषेतून शिक्षण देणे आवश्यक आहे. मात्र इथे जी हिंदीची तयारी आपण करून घेतो ती नको तितकी वाङ:मयीन आहे. आपणाला हिंदी वाङ:मयाची शालेय पातळीवर काहीही गरज नाही. धंद्यासाठी लागणारी व्यवहारी हिंदी हेच आपले पाचवी ते सातवीपर्यंत हिंदींचे लक्ष्य असले पाहिजे. हिंदी इंग्रजीच्या तुलनेने आपणाला सोपी जाते याची कारणे सहज स्पष्ट आहेत. पहिले म्हणजे दोन्हीही भाषा ह्या संरचनात्मक पातळीवर एकसारख्या आहेत, उदाहरणार्थ कर्ता, कर्म, क्रियापद ही वाक्याची रचना. दुसरे दोन्हीही भाषांवर संस्कृत, फारसी व इंग्रजीचा एकसारखाच परिणाम आहे. त्यामुळे शब्दसंग्रहात बरेच शब्द दोन्हीकडे समान आहेत. तिसरे कारण चित्रपट व टी.व्ही.मुळे हिंदी ही एकदम घरची भाषा झाली आहे. आज मराठी माणूस मराठीपेक्षा हिंदी चित्रपट पाहणे पसंत करतो त्यावरून हे स्पष्ट होईल. चौथे कारण दोन्हींची लिपी समान देवनागरी आहे. त्यामुळे ती वाचणे सहजसोपे जाते. त्यामुळे इंग्रजीबद्दल जसा एक फोबिया आपल्या मनात असतो तसा हिंदींबाबत असत नाही. त्यामुळे हिंदीची ओळख पाचवीपासून ठेवता येईल. मी ज्या शाळेत शिकलो तिथे हिंदी, संस्कृत संयुक्त होते. हाही पर्याय चांगला आहे. संस्कृतमुळे आपली समाजव्यवस्था अधिक स्पष्ट कळते; कारण आपली सर्वांची मुळे संस्कृत, पाली, अर्धमागधीतच आहेत. मात्र संस्कृत शिकवताना प्राचीन समाजावरच आधारित धडे शिकवावेत. संस्कृत ही मृत भाषाच राहणार ही वस्तुस्थिती आपण स्वीकारावी हे उत्तम. उगाच आधुनिक संवेदना तिच्यात मांडत बसू नयेत. हिंदी मात्र महत्वाची आहे. पाचवी ते सातवी संभाषणात्मक हिंदींची तयारी झाली की आठवी ते दहावी मानव्यविज्ञानाशी निगडित धडे त्यात असावेत. पाचवी ते सातवी बारा हिंदी चित्रपट दाखवावेत. त्यांच्या संहिता हिंदी पाठ्यपुस्तकात छापाव्यात. व्हिडीओमुळे चित्रपट दाखवणे सहज सोपे झाले आहे. आठवी ते दहावी मानव्यशाखांशी निगडित हिंदी डाक्युमेंटरीज अभ्यासक्रमात

असाव्यात, तसेच भारतीय समाजविषयाचे निबंध व गद्य त्यात समाविष्ट करावे. उदाहरणार्थ, दया पवार यांच्या 'बलूतं' ह्या कादंबरीतील दलितत्व दर्शवणारा भाग हिंदीत अनुवादित करून तो धडा म्हणून छापावा. पाचवी ते सातवी चित्रपटांची निवड करताना करमणूकप्रधान चित्रपट निवडू नयेत, तर ऐतिहासिक चित्रपट दाखवावेत किंवा 'गोदान', 'दो बिघा जमीन', 'मदर इंडिया' यांसारखे सामाजिक चित्रपट असावेत. आठवी ते दहावी 'जुनून' ह्यासारखे चित्रपट अभ्यासक्रमात असावेत. त्यावरील प्रश्न वाङ:मयीन कमी आणि मानव्यविज्ञानाच्या दृष्टीने अधिक महत्वाचे असतील असे असावेत. इथे डाक्युमेंटरीजवर जास्त भर द्यावा.

अकरावी-बारावी-तेरावीला मानव्यविज्ञानाचे माध्यम मातृभाषाच असायला हवे. मात्र विज्ञान शाखेला तयारी करून घेताना आपण तिथे फक्त इंग्रजीची तयारी करून घेणे हे उद्दिष्ट ठेवले. इथे मात्र इंग्रजी व हिंदी असा संयुक्त अभ्यासक्रम ठेवावा; मात्र संयुक्त अभ्यासक्रम नेहमी पन्नास पन्नास टक्के अशी विभागणी असते ती बदलून साठ टक्के इंग्रजी आणि चाळीस टक्के हिंदी अशी विभागणी करावी. इथेही इंग्रजीत 'विज्ञान आणि अर्थशास्त्र', 'विज्ञान आणि राज्यशास्त्र', 'विज्ञान आणि समाजशास्त्र' ह्यांचे संबंध स्पष्ट करणारे निबंध अभ्यासक्रमात छापावेत. ह्याशिवाय मानव्यविज्ञानाशी निगडित निबंध हिंदी व इंग्रजीत छापावेत. अकरावी-बारावीला जे मानव्यविज्ञान असते त्याला जोडून हे निबंध असावेत. इथेही हिंदी व इंग्रजीचे उलटेसुलटे व्याकरण व उजळणी करून घ्यावी आणि इंग्रजी व हिंदीतील मानव्यविज्ञान विषयीचा कोणताही ग्रंथ वाचता येईल ते पाहावे. विज्ञानशाखेत ज्या गोष्टी दोन वर्षात साध्य केल्या जातील त्या इथे तीन वर्षात साध्य करून घ्याव्यात. त्यामुळे इथे ज्युनिअर कॉलजेचा अभ्यासक्रम दोन वर्षांऐवजी तीन वर्षांचा ठेवावा. इथे विषयाची पुस्तके छापताना ती मराठीत छापावीत व त्या मानव्यविज्ञानाची जी खास टर्मिनॉलॉजी आहे ती त्या त्या ठिकाणी कंसातच छापावी. ह्या तीन वर्षात कला ह्या विषयात मराठी चित्रपट, नाटक, नृत्य, साहित्य ह्या सर्वांची सृजनात्मक तयारी करून घ्यावी. ह्या तीन वर्षात वर्तमानपत्रात लेखन कसे करावे. कविता कशी करावी, गद्य कसे लिहावे हे शिकवणारा अभ्यासक्रम तयार करावा; त्याचबरोबर चित्रपटांच्या तांत्रिक गोष्टींचा सुबोध परिचय असावा. युवागृहात नाचता नाचता नृत्याची तयारी होईलच. फक्त ह्या नृत्याची शास्त्रीय चिकित्सा असावी. चित्रपट,नाटक, नृत्य यांचा आस्वाद अभ्यासक्रम ह्याच तीन वर्षात समाविष्ट करावा. साधारण चित्रपटाचा व नाटकाचा आस्वाद अभ्यासक्रम एका वर्षात पूर्ण होतो. साहित्यानिर्मितीची मात्र प्रत्यक्ष प्राथमिक तयारी करून घ्यावी. जेणेकरून भाषेवर प्रभुत्व येऊन हे मानव्यशास्त्रज्ञ व्यापार किंवा नोकरी करताना उत्तम रीतीने विचार मांडतील. इथे जाहिरातीची भाषा, ग्रीटींगची भाषा,

निगोशिएशन्सची भाषा, वर्तमानपत्रातील लेखाची भाषा आणि साहित्याची भाषा असे सर्व स्तर परिचित करून द्यावेत.

महाविद्यालयीन शिक्षण हे दोन माध्यमांत ठेवणे आवश्यक आहे. सर्वच विषय इथे मातृभाषेतून शिकवावेत. फक्त त्या त्या मानव्यशाखेतला पाश्चात्त्य विचारांचा इतिहास आहे तो इंग्रजीतून शिकवावा. हा विषय दोन पेपरमध्ये विस्तृत अणि सखोल मांडणीचा असावा. बाकीचे सर्व विषय मातृभाषेतून शिकवावेत. इथे कला व विज्ञान हा संयुक्त विषय असावा. ह्या विषयात अकरावी ते तेरावी ह्या तीन वर्षात ज्या गोष्टींचा परिचय होता त्यांचा अधिक सूक्ष्म परिचय असावा. इथेच विज्ञान व अर्थशास्त्र विज्ञान व राज्यशास्त्र, विज्ञान व समाजशास्त्र, विज्ञान व व्यापार ह्यांचा तंत्रज्ञानात्मक बाबींना महत्त्व देणारा अभ्यासक्रम समाविष्ट असावा. कॉम्प्युटर वगैरे तंत्रज्ञानाचा परिचय इथेच होऊन जावा व विद्यार्थ्याकडून त्याबाबत सरावही करून घ्यावा. अर्थात चित्रपट, नाटक, वाङ:मय हे मराठीतीलच असावे. फक्त चित्रपटाबाबत हिंदी व मराठी यांना समान वजन द्यावे. इथेच एक पेपर हा इतर भारतीय भाषेतील मानव्यविज्ञानातील विचारांचा असावा आणि एक पेपर हिंदीत असावा. ही त्रिमाध्यमी पद्धत आज थोडी विचित्र वाटेल; पण सराव झाला की सवयीची होऊन जाईल.

भारतातील कलेचे शिक्षण कसे असावे याचा थोडाफार विचार ह्यापूर्वी मी केला आहेच. त्यात थोडीशी भर टाकून आपण इतर महत्वाच्या बाबीकडे वळू. भारतात कलामहाविद्यालयांचा रोल काय ? ह्या प्रश्नाचे उत्तर विज्ञान आणि मानव्यशाखापेक्षा अधिक सोपे आहे. विज्ञान महाविद्यालयांचे कामच मुळी (१) वैज्ञानिक, (२) डॉक्टर किंवा इंजिनिअर्ससारखे उच्च तंत्रज्ञ, (३) फिटर वगैरे कामगार तंत्रज्ञ, (४) वैज्ञानिक अधिकारी, (५) वैज्ञानिक व्यवस्थापक, (६) विज्ञानसंस्थात किंवा कारखान्यात लागणारा स्टाफ, (७) विज्ञान शिक्षक तयार करणे हे आहे. ह्या सर्वांनी भारताच्या संदर्भातच काम केले पाहिजे. जर ह्यांचे शिक्षण भारतातील जनतेने कररूपाने दिलेल्या पैशाच्या साहाय्याने होत असेल तर ह्यांनी भारतीय जनतेचीच सेवा केली पाहिजे. भारतीय जनतेच्या पैशाच्या सहाय्याने शिकायचे आणि अमेरिकन लोकांची, त्यांनी काळे म्हणून वाईट वागणूक दिली तरी, गाडी-फ्लॅटच्या बदल्यात सेवा करायची ही वेश्यागिरी भरपूर झाली. हे खरेतर वेश्येपेक्षा वाईट आहे. वेश्यासुद्धा ज्याच्याकडून पैसे घेते त्यालाच शरीर देते. ही खरेतर भडवेगिरीच म्हणायला हवी. दुसऱ्यांची शरीरे भांडवल म्हणून वापरायची आणि तिसऱ्याला विकून मधल्यामध्ये त्या सेवेचा पैसा उकळायचा. हे भडवे लोक एवढे निर्लज्ज आहेत की भारतात येऊन वर त्यांचे समर्थन करतात. असो. हे जर थांबवायचे असेल तर विज्ञान क्षेत्रातल्या लोकांना

अकरावी-बारावीलाच आम्ही त्यांना का शिकवत आहोत ते स्पष्टपणे सांगायला पाहिजे. मी अकरावी-बारावीलाच विज्ञान आणि समाज हा विषय अभ्यासक्रमात समाविष्ट करायला सांगतो त्यामागे वर दिलेले कारणही आहे. विज्ञान क्षेत्रातल्या लोकांची समाजाविषयीची संवेदना आज इतकी बधिर झालीये की ह्या गरीब देशातल्या समस्या, ते ह्या समाजाची बौद्धिक साय असल्याने, त्यांनाच सोडवायच्या आहेत हीही गोष्ट हे लोक विसरून गेले आहेत. अमेरिकेतील समस्या अमेरिकन सोडवताहेत. तुमच्याविना तिथली इस्पितळे आणि संशोधने अडून राहिलेली नाहीत; पण भारतात मात्र तुम्ही नसलात की खूपच अडवणूक होते; कारण सगळे चांगले लोक तिकडे आणि गाळ इकडे अशी अवस्था होते. सुदैवाने सर्वांचीच संवेदनशीलता अद्याप बधिर झालेली नाही; पण ज्यांची होऊ घातलीये त्यांना मला विचारावेसे वाटते की, बाबांनो, ह्या देशातले प्रश्न तुम्ही सोडवणार नाही तर सोडवणार कोण ? इथे अमेरिकेसारखे नाही म्हणून तुम्ही तिकडे जाता, पण महाबुद्धिमान माणसांनो, जर इथे अमेरिकेसारखे असते तर इथे समस्याच कशाला निर्माण झाल्या असत्या ? तेव्हा इथे रहा. इथल्या समस्यांशी झुंजा. सुरुवातीला अडथळे येतील; पण नंतर कौतुकपण पदरात पडेल. इथे संघर्षातच दहा-दहा, पंधरा-पंधरा वर्षे जातात हे खरे, पण नंतर इथे जो आदर मिळतो तोही ही सगळी कसर भरून काढणारा असतो.

मानव्यविज्ञानाबाबतही भारतात त्यांनी काय करायला हवे ते मागेच स्पष्ट केले आहे. भारतीय मानवाच्या समस्या आंतरराष्ट्रीय संदर्भात सोडवणे हेच त्यांचे काम असेल; मात्र त्यासाठी देशीवादासारख्या भोंगळ चळवळी सोडायला हव्यात. आंतरराष्ट्रीय क्षेत्रात दंड थोपटून उभे रहायला हवे, पण त्यासाठी लागणारी शस्त्रे तुमची हवीत. शस्त्रे त्यांच्याकडून आयात करायची आणि युद्धही त्यांच्याशी करायचे हे शक्य नाही. मात्र शस्त्र तयार करायचे तंत्रज्ञान त्यांच्याकडून शिकायला हवे आणि ते नेमके काय करत आहेत, त्यांची शस्त्रे कसली आहेत हेही तुम्हाला कळायला हवे. त्यासाठी दृष्टी आंतरराष्ट्रीयच हवी. देशीवादी दृष्टिकोनातून काहीच होणार नाही. प्रत्येकवेळी त्यांनी घोडा घेऊन यायचे, आम्ही हत्ती घेऊन लढाई हारायची. त्यांनी बंदूक आणायची, आम्ही तलवारीने लढून लढाई हारायची हे खूप झाले. आता त्यांनी बंदूक आणण्याच्या आधीच आपण तिथे मिझाईल घेऊन पोहचले पाहिजे. तरच आपला निभाव आहे. मानव्यविज्ञानाने त्यासाठी प्रथम माणूस उलगडून दाखवायला हवा. जो सगळीकडे आहे आणि त्यानंतर इथल्या कंडीशनिंगच्या प्रक्रिया उलगडायला हव्यात. तिथल्या कंडीशनिंगच्या प्रक्रिया उलगडायला हव्यात. तिथल्या कंडीशनिंगच्या प्रक्रिया उलगडताना मला माझा प्रॉडक्ट तिकडे खपवायचा असेल तर तिथे मला किती संधी, वाव आहे हे मला कळले पाहिजे. मी माझ्या वस्तू फक्त भारतातच खपवणार हा देशी

| आनंद | रति | हर्ष | शांती | जिज्ञासा | संपादन | स्नेह | भूक | निरर्थकता | हताशता | अहं | वंचना | भय | आक्रमण | आकांक्षा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| प्रसन्नता | लज्जा | निरागसता | तृप्ती | शंका | प्राप्ती | आस्था | कामतृष्णा | तटस्थता | विषाद | असुया | वेड | चिंता | क्रोध | मोह |
| चेष्टा | श्रृंगार | निर्व्याज | समाधान | संशय | रक्षण | सहानुभूती | निद्रा | असंगतता | बधिरता | मद | आभास | धास्ती | क्रौर्य | उन्माद |
| खोडकरपणा | हौतात्म्य | कोवळीक | निर्लिप्त | संभ्रम | संघर्ष | दया | ग्लानी | स्मृती | सुन्नपणा | गर्व | -- | काळजी | उच्छाद | आवेग |
| मूर्खता | समर्पण | बालसुलभता | आनंद | अज्ञेयता | स्पर्धा | -- | उत्पात | दुरावा | शोक | दंभ | -- | द्वेष | उग्रता | तळमळ |
| मूढता | विसर्जन | -- | करुणा | शोधकता | स्वामित्व | -- | विकलांगता | स्वप्नीलता | खिन्नता | आमर्ष | -- | गोपनीवता | संघर्ष | आसक्ती |
| अतिरेक | भक्ती | -- | स्तब्धता | चिकित्सा | -- | -- | वेग | दुभंगलेपण | व्याकुळता | दया | -- | लाज | संरक्षण | झपाटलेपण |
| गोंधळ | भारलेपण | -- | मुक्त | औत्सुक्य | -- | -- | गती | फुटिरता | वैताग | स्वतंत्रता | -- | सावधानता | -- | अपेक्षा |
| खिलाडूपणा | व्याकुळता | -- | शून्यता | कानोसा | -- | -- | श्रम | विखुरलेपणा | विनाश | ईर्षा | -- | असुरक्षितता | -- | दुःखनाश |
| चमत्कृती | सम्मोहन | -- | विरक्त | चाहूल | -- | -- | तहान | चिंतन | पडझड | स्वामित्व | -- | -- | -- | ध्यास |
| भोळेपणा | वात्सल्य | -- | प्रीती | उत्कंठा | -- | -- | झटका | आभास | उत्पात | हट्टीपणा | -- | -- | -- | -- |
| निर्व्याज | -- | -- | संन्यस्त | -- | -- | -- | जागृती | समजुतदारपणा | धक्का | स्वाभिमान | -- | -- | -- | -- |
| विसंगती | -- | -- | जागृती | -- | -- | -- | मरण | अवधानता | आळस | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | व्याधी | उपरेपणा | कंटाळा | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | आळस | पोरकेपणा | सल | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | कंटाळा | परकेपणा | खेद | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | यातना | परस्परविरोध | -- | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | ठणका | विसंगती | -- | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | धकवा | सहिष्णुता | -- | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | अशक्तपणा | विवेक | -- | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | दुबळेपणा | विस्मय | -- | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | झडता | -- | -- | -- | -- | -- | -- |
| -- | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | अनिश्चितता | -- | -- | -- | -- | -- | -- |

अट्टाहास मूर्खपणाचा होईल.

कलाशाखेबाबत आपले भान पक्के हवे. स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाला संपूर्ण उपलब्ध होणे म्हणजे मोक्ष आणि हा मोक्ष हेच शिक्षणाचे उद्दिष्टे असले पाहिजे हे आपण पाहिले. कला म्हणजे माणसाचे भावात्मक शिक्षण होय. स्वत:च्या व्यक्तिमत्त्वाला संपूर्ण उपलब्ध होण्यासाठी मुळात स्वत:चे व्यक्तिमत्त्व कळले पाहिजे. माझे व्यक्तिमत्त्व मला कसे कळू शकते ? मी एखाद्या खोलीत एकटाच बसलो तर माझे व्यक्तिमत्त्व मला कळू शकेल काय ? ह्याचे स्पष्ट उत्तर नाही असे आहे. ते जर कळायचे असेल तर मी इतरांशी कसे संबंध ठेवतो तेच पाहिले पाहिजे. मी स्वार्थी आहे की नाही हे कळायचे असेल तर मी इतरांशी वागताना माझे स्वत:चे हितसंबंध किती सांभाळतो तेच पाहिले पाहिजे. कला हे असे समग्र 'इतर' असते. मानव स्वत:शी, इतरांशी आणि ह्या विश्वाशी कसे संबंध ठेवतो, का संबंध ठेवतो ह्याचे सभावात्मक आकलन म्हणजे कला विज्ञान आणि मानव्य विज्ञान हे आकलन भान वगळून करतात त्यांचे आकलन निर्भावात्मक असते. कला हे आकलन सभावात्मक मांडते. सर्वसाधारणपणे कलातील भावांची संरचना पुढीलप्रमाणे मांडता येईल. ह्या संरचनेतील शरीरभाव हा प्रामुख्याने शरीराशी निगडित आहे. उरलेले भाव मानसिक आहेत. त्या सर्वांची यादी शेजारील पानावर दिली आहे.

मागील पानावरील सर्व भाव संचारित केल्याशिवाय कलाकृती अस्तित्वात येऊ शकत नाही. घटना एकच असते, विश्वही तेच असते, पण वैज्ञानिक विश्वातले सगळे भाव काढून घेऊन ती घटना बघतो आीण निष्कर्ष काढतो आणि त्यातून नवीन तंत्रज्ञान शोधून अनेक वस्तू निर्माण करतो, तर कलावंत विश्वातले सगळे भाव अधिक खोल नजरेने पहात त्यातून नवीन तंत्रज्ञानाच्या साहाय्याने भाव भरत नवी सृष्टी अर्थात कलाकृती निर्माण करतो. वैज्ञानिकाने निर्माण केलेली वस्तू ही अनेकदा मूळापेक्षा वेगळी असते. पुस्तक, टेपरेकॉर्डर वगैरे वस्तू निसर्गात जशा आहेत (पुस्तक काय किंवा टेपरेकॉर्डर काय मानवी मेंदूत अस्तित्वात असतातच) त्यापेक्षा वेगळ्या स्वरूपात वैज्ञानिकानी निर्माण करून दाखवलेत. माणसाच्या स्मृतिकेंद्रापेक्षा टेपरेकॉर्डर निश्चितच वेगळा आहे. मात्र अद्याप तरी तो मानवी मेंदूची बरोबरी करू शकत नाही. वैज्ञानिकांची सगळी यंत्रे ही मानवी शरीरात सूक्ष्म किंवा स्थूल पातळीवर सापडतात. त्यामुळे अहम ब्रह्मास्मि हा अहंकार अद्यापही माणसाला शोभून दिसतो असे म्हणायला हरकत नाही कधीकधी वैज्ञानिक निसर्गापेक्षा अधिक मोठी वस्तू तयार करतो. उदा. मानवी हातापेक्षा यंत्राचे हात हे अधिक कार्यक्षम आणि अधिक ओझे उचलणारे असतात. ही यंत्रे एका अर्थाने मानवाचा विस्तार असतात.

मात्र जी करामत एकटा हात करतो ती यंत्रांना जमणे अवघडच जाते. यंत्रे कितीही कार्यक्षम झाली तरी ज्या नजाकतीने मानवी शरीर दुसऱ्या मानवी शरीराशी संभोग करेल त्या नजाकतीने यंत्रे कधीही हे काम करू शकत नाहीत. अजूनतरी यंत्राना स्पर्श ही संवेदना प्राप्त झालेली नाही. थोडक्यात, लाइफ इज लार्जर दॅन सायन्स हे विज्ञानाबाबत खरे आहे. जी गोष्ट विज्ञानाची तीच गोष्ट कलांची. लाइफ इज ऑलवेज लार्जर दॅन आर्ट. आपल्याकडे ग्रेससारख्या रोमॅण्टिक कवींनी आर्ट इज लार्जर दॅन लाइफ चा घोष 'मितवा'सारख्या पुस्तकातून केलाय म्हणून हे सांगायला हवे. कलावंतसुद्धा अनेकदा मुळापेक्षा वेगळी अशी कलाकृती निर्माण करतो. विश्वातील वस्तूंची, मानवांची, निसर्गाची, ध्वनिसौष्ठवअर्थरूपे तो माध्यमातून निर्माण करतो. निसर्गात रंग असतात. तो आपले कृत्रिम रंग तयार करतो. निसर्गात वस्तूंची सौष्ठवरूपे असतात. तो आपली कृत्रिम सौष्ठवरूपे निर्माण करतो. विश्वात ध्वनी असतो. तो आपले कृत्रिम ध्वनी निर्माण करतो. यांच्या संघातानाच आपण कलाकृती म्हणतो. कलाकृती म्हणजे अशा कृत्रिम माध्यमाचा संघात होय. मात्र मानवी हातापेक्षा जसा यंत्राचा हात ओझी उचलण्याबाबत कार्यक्षम असतो, तसाच काहीसा प्रकार संगीताबाबत होतो. संगीत हा ध्वनींचा असा विस्तार होय. तो मुळापेक्षा प्रचंड सुधारित व कार्यक्षम असतो; पण निसर्गात आढळणाऱ्या सगळ्या ध्वनींपुढे मानवी संगीत कमीच होय. दोन वस्तूच्या घर्षणातून निर्माण होणाऱ्या नादात इतकी विविधता आढळते की, ती सगळी संगीतात येऊच शकत नाहीत. मानवाच्या मलूभूत गरजांत कपडे ही जशी एकदम वेगळी गरज आहे. ती वैज्ञानिकांनी निर्माण केलेली नको तितकी निसर्गापेक्षा वेगळी बाब आहे. तसेच संगीताचे झाले आहे. ती कपड्यासारखीच अतिकृत्रिम तरीही अत्यावश्यक व सवयीची कलाबाब बनली आहे. तरीही निसर्गातील सूक्ष्म आणि स्थूल ध्वनींची विविधता इतकी असते की मानव त्याबाबत निसर्गापेक्षा कमी पडतो. उदा. मानवी गळा आणि मानवी वाद्ये. निसर्गाने प्रत्येकाला दिलेला गळा इतका वेगळा असतो की प्रत्येकाचा आवाज वेगळा निर्माण होतो. ह्या आवाजांची विविधता अब्जावधी रूपात आढळते. मानवी वाद्ये हजारातही नाहीत. थोडक्यात, लाइफ इज ऑलवेज लार्जर दॅन आर्ट ही वस्तुस्थिती असते. शिक्षण देताना ही जाणीव देणे फार महत्वाचे आहे. निसर्ग मानवापेक्षा मोठा आहे हे जोपर्यंत आपण ठसवत नाही, तोपर्यंत पर्यावरणाचा प्रश्न सुटणे अवघड आहे. त्याचबरोबर कलाशिक्षणात भावाचे नेमके स्थान कळाल्याशिवाय कलाशिक्षण नीट आखता येणे शक्य नाही. कलाकृती ही भावांनी संघटित केलेली असते आणि प्रत्येक भाव हा खालील गुणधर्मांनी युक्त असतो.

| द्रविक (Matteric) | शाक्त (Energic) | गतीक (velocitic) | आकारीक (Formic) |
|---|---|---|---|
| व्याप्ती | कायापालटता | वेग | समतोलपणा |
| सूक्ष्मता | पीळ | धार | प्रमाणबद्धता |
| स्थूलता | अक्षरता | तरलता | आयामता |
| क्षेत्रविस्तार | ठोसपणा | लवचिकता | विविधता |
| | दृढपणा | स्थितिशीलता | औचित्य |
| | बलवत्ता | गतिशीलता | अचूकता |
| | वजन | | समायोजकता |
| | | | ज्ञानता |
| | | | जटिलता |
| | | | निर्भयता |
| | | | स्पष्टता |

संगीतात ध्वनी, सौष्ठवकलात सौष्ठव, मुद्राकलात मुद्रा, साहित्यात अर्थ हे नेहमीच भाववाहक असतात. विज्ञानात जसा एखादा पदार्थ वाहक conductor असतो, तसेच कलांत त्या त्या कलेचे माध्यम भाववाहक असते. किंबहुना त्याशिवाय ते माध्यम ह्या संज्ञेला पात्र ठरू शकत नाही. साहित्यसमीक्षेत मर्ढेकरांनी जो घोटाळा केला तो साहित्यात अर्थ वगळून संगीताप्रमाणे अर्थशून्य भाववाहकतेला महत्त्व देऊन ! त्यामुळेच त्यांची समीक्षा आकारिक झाली. भाषेत अर्थ हाच भाववाहक असतो हे लक्षात घेतले की शुद्ध कलावाद्यांना पुनःपुन्हा आशयावर उड्या का माराव्या लागतात ते सहज लक्षात येईल. एकीकडे हे आकृतिवादी, कलावादी लोक, तर दुसरीकडे नेमाडेंसारखे निखळ अर्थालाच सर्वस्वी महत्त्व देणारे लोक ! त्यांनी भावांच्यांकडे व ह्या भावांच्या वर निर्देश केलेल्या गुणधर्माकडे पूर्ण दुर्लक्ष केलेले आहे. जी गोष्ट भरतासारख्या लोकांना हजारो वर्षांपूर्वी कळली ती आपणाला कळायला आणखी किती वर्षे लागणार आहेत कोण जाणे ? संस्कृत समीक्षा ही आकारिक ठरवण्याचा खटाटोप हल्ली काहीजण करतायत. प्रत्यक्षात ती आकारिक नाही किंवा अर्थप्रधानही नाही. ती भावप्रधान आहे. रस ह्या शब्दावर वाजवीपेक्षा अधिक भर दिल्यामुळे ती गैरसमज निर्माण करते. म्हणूनच मी इथे भावावर भर देऊन मांडणी केली आहे. ती संस्कृतमधून आलीये म्हणून किंवा ती ब्राह्मणी आहे म्हणून तिला टाकाऊ समजणारे

काही लोक आहेत. विशेषत: दलित लोकात हा गैरसमज दृढ आहे. त्यांना एक गोष्ट सांगणे आवश्यक आहे, ती म्हणजे भरताच्या नाट्यशास्त्राच्या शेवटच्या अध्यायात भरताच्या सर्व शिष्यांना देवांनी तुम्ही शुद्र व्हाल असा शाप दिला आहे. हा शाप केवळ सत्याचे दंतकथेत केलेले रूपातंर आहे. प्रत्यक्षात सर्वच कलावंत सुतार-लोहारापासून स्थापत्यकार, नृत्यकार, अभिनेते यांच्यापर्यंत भारतात शूद्रच समजले गेलेत. बहुतेक कलावंतांचा दर्जा हा गणिकेचा, शूद्राचा होता. नाट्यकला व गायनकला तर उघड उघड त्यांचीच होती. ह्याला अपवाद फक्त ग्रंथकार आणि साहित्यकार होते. त्यांना मात्र ब्राह्मणांचा दर्जा होता. त्यामुळे वाङ:मयावर ते वाङ:मय कुणी लिहिले ह्याचा उल्लेख आढळतो. ह्याउलट अजंठा आणि वेरूळ वगैरे ठिकाणी कलावंताचे नाव नाही. ह्याचे स्पष्टीकरण आपण अनेकदा त्यांना नावे देण्याचा मोह नव्हता म्हणून त्यांनी नावे दिली नाहीत असा करतो. ज्या राजाने मंदिर बांधले त्याला आपले नाव ठेवण्याचा मोह होतो आणि कलावंताना मात्र त्यांची नावे मागे ठेवावीशी वाटत नाहीत हे म्हणणे पटत नाही. वस्तुस्थिती अशी होती की, कलावंतांना त्यांची नावे मागे ठेवण्याइतका सामाजिक दर्जाच नव्हता. कारण हे कलावंत मूळचे अनार्य किंवा शूद्र होते. पांडवांना मयसभा बांधण्यासाठी मय नावाच्या असुराला बोलवावे लागले हा योगायोग नव्हे. कारण कृषीप्रधान संस्कृतीमुळे अनार्यांच्यात जशा कला विकसित झाल्या तशा आर्यांच्यात झाल्या नाहीत. पुढेही ह्या कला आर्यांच्या उपजीविकेचे साधन झाल्या नाहीत. अर्जुनाला बृहन्नडा म्हणून नाचावे लागले तरी नृत्यविद्या ही त्याची मुख्य विद्या कधीच नव्हती आणि ह्या नाचण्याकडे बघण्याचा दृष्टिकोन एक शाप असाच दिसतो. त्याचा कुठे अभिमान वगैरे दिसत नाही. मराठीत खालचा दर्जा सुचवणारे कलावंतीण किंवा नायकीण हे शब्द, 'बामणाच्या घरी लिवणं आणि म्हाराच्या घरी गाणं' ह्यासारख्या म्हणीही कलावंत शुद्र होता हेच सूचित करतात. साहित्यावर प्रचंड ग्रंथनिर्मिती दिसते, पण दृककलावंतांवर कोणी फारसे लिखाण केलेले दिसत नाही. कारण तशी फारशी गरज कुणाला वाटत नव्हती असे दिसते. मुस्लिम राजवटीत कलावंतांनी केलेले धर्मांतर हेही उच्च दर्जा प्राप्त करून घेण्याच्या प्रयत्नाचाच भाग आहे. तेव्हा भरताच्या नाट्यशास्त्राला ते केवळ संस्कृतमध्ये लिहिले आहे म्हणून ब्राह्मणी मानून फेकून देणे चुकीचे आहे. त्यामधे प्रचंड चुका आहेत त्या आपण दुरुस्त केल्याच पाहिजेत. आपल्याला त्यापुढे जाऊन विचार करायला हवा हे उघडच आहे; पण तो ग्रंथ महत्वाचा आहे. तो इथल्या शुद्रांनी निर्माण केलेल्या कलेवरच आधारलेला आहे. ते समजा ब्राह्मणी असते तरी तो फेकायची गरज नाही. ब्राह्मणवर्गाकडून ब्राह्मणेतरांनी शिकाव्यात अशा बऱ्याच गोष्टी आहेत. ब्राह्मणांनी समता, उदारमतवाद वगैरे गोष्टी जशा शिकायला हव्यात तशाच

आपणही त्यांच्याकडून स्वच्छता, ज्ञानाची पिपासा शिकायला काहीच हरकत नाही. असो. सांगण्याचा मुख्य मुद्दा असा की कलाशिक्षणाचा विचार करताना कलेतल्या ह्या भाववाहकतेचा विचार आपण करायला हवा. तरच आपणाला काय करायचे आहे ते स्पष्ट होईल. आता आपण कलाशाखेच्या शिक्षणाकडे वळू.

ज्याप्रमाणे विज्ञान क्षेत्राला वैज्ञानिकांची आणि तंत्रज्ञांची गरज असते त्याचप्रमाणे कलाक्षेत्राला (१) शुद्ध कलावंत आणि (२) व्यावसायिक कलावंत ह्यांची गरज असते. ह्याखेरीज समीक्षक व शिक्षकाची गरज असते. आज आपण कलाक्षेत्रातला शैक्षणिक गोंधळ पाहिला तर हे शिक्षण कलावंत निर्माण करण्याऐवजी समीक्षक व शिक्षक निर्माण करण्यासाठी आहे की काय अशी शंका येते. विशेषत: साहित्याच्या शिक्षणावर सध्या समीक्षकांची एकप्रकारची शैक्षणिक दादागिरी चालू आहे हे स्पष्ट दिसते. साहित्याचा अभ्यासक्रम पाहिल्यावर ह्यात कुठेही साहित्यिक निर्माण करावा असे उद्दिष्ट ठेवलेले दिसत नाही. उलट समीक्षकांची मच्छराप्रमाणे पैदास हेच ह्या अभ्यासक्रमाचे उद्दिष्ट दिसते आणि आश्चर्य म्हणजे एकाही कलावंताने ह्याविरुद्ध आवाज काढलेला नाही. ह्या क्षेत्रातल्या कलावंतांनाही प्राध्यापकगिरीची एवढी घाण सवय झालीये की सगळ्यांची आकाशात देव आहे आणि पृथ्वीवर सर्व काही ठीक चालले आहे अशी खात्री पटल्याची शंका येते. रिचर्डसपासून देरीदापर्यंत, फ्रॉईडपासून युंगपर्यंत मोठी मोठी नावे घेणाऱ्या ह्या लोकांना प्रथम एक गोष्ट सांगायला हवी ती म्हणजे साहित्यशिक्षणाचा उद्देश गंगाधर पाटील, म.सु. पाटील निर्माण करणे हा नाही, तर दिलीप चित्रे, नामदेव ढसाळ, भालचंद्र नेमाडे निर्माण करणे हा आहे. युरोपच्या पोटातून प्रत्येक वेळी देरीदा, याकोबसन आणण्यापेक्षा मिलान, कुंदेराच्या कादंबऱ्या मराठीत आणणे हे मराठी साहित्याला अधिक पूरक आहे. ह्याचा अर्थ देरीदा नको असा नाही, पण ते काम पूर्णपणे आपण करू नये. मला एक प्रश्न नेहमीच पडतो की देरीदाच्या विचारांचा परिचय (हा परिचय गंगाधर पाटील सुंदर रीतीने करून देतायत ह्यात शंका नाही. त्याबद्दल आम्ही त्यांचे ऋणीच राहू) गंगाधर पाटील करून देतायत तर समाजशास्त्रातले लोक काय देरीदाबाबत झोपा काढत आहेत काय ? फ्रॉईड, युंग वर लिहिण्याची जबाबदारी म. सु. पाटील यांची की मानसशात्रज्ञांची ? हे लोक आपल्या विषयात नेमके काय करत आहेत ? ह्या देशात मानव्यवैज्ञानिक आपली जबाबदारी नीट पार पाडत नाहीत असे मला वाटते. मला इथे समीक्षकांवर टीका करायची नाही किंवा समीक्षा व्यर्थ आहे असेही म्हणायचे नाही पण कलाशिक्षणाचा मुख्य उद्देश हा कलावंत निर्माण करणे हाच असला पाहिजे असे माझे ठाम मत आहे. कलाशिक्षणाने समीक्षक व शिक्षक निर्माण करण्याची जबाबदारी घेऊ नये. अपयशी कलावंत झालेले पण कलेवर

प्रेम करणारे लोक आपोआपच समीक्षा लिहितात. ह्याशिवाय कलावंत निर्माण करतात ती समीक्षा अधिक उजवी असते असे माझे स्पष्ट मत आहे. शिक्षक हा कलावंतच असला पाहिजे असे माझे स्पष्ट मत आहे, कदाचित त्याचा दर्जा दुय्यम कलावंताचा असेल पण तो प्रथम कलावंत असला पाहिजे. जो माणूस स्वत: सृजनशील नाही तो इतरांची सृजनशीलता काय बाहेर काढणार ? थोडक्यात, कलाशिक्षणात जो काही आजकाल समीक्षकांचा दबदबा चाललाय तो कमी करून तिथे कलावंतांची दादागिरी निर्माण करायला हवी. शिक्षक म्हणून काही गोष्टी वेगळ्या आत्मसात कराव्या लागतात त्या तो कलावंत जर त्याला शिक्षक व्हायचे असेल तर बी. एडच्या अभ्यासक्रमात आत्मसात करेल. तेव्हा ही जबाबदारी बी. ए. डिग्रीने अजिबात शिरावर घेण्याची गरज नाही. कलाशिक्षणाचा मुख्य हेतू सृजनशील कलावंत घडवणे हा असल्याने कलाशिक्षकाबाबतही आपले क्वालिफिकेशन सौम्य करावे लागेल. समजा, एखादा मनोहर ओकसारखा कवी शिक्षक म्हणून मिळत असेल तर त्याला आर्ट टीचर्स डिप्लोमा पूर्ण करायला लावून नोकरीवर ठेवण्याची तरतूद आपण करायला हवी. त्यासाठी प्रत्येक शिक्षणसंस्थेच्या हातात दहा टक्के जागा राखीव असाव्यात आणि ह्यातून मनोहर ओक, एम. एफ. हुसेन सारखी माणसे भरली जावीत. फक्त भ्रष्टाचार होऊ नये म्हणून शिक्षकाचा अभ्यासक्रम त्यांना पूर्ण करायला लावला पाहिजे. आपल्या देशात हल्ली जातिनिष्ठ राखीव जागा ठेवण्याची पद्धत असल्याने इथे गुणवत्तेसाठी जागा राखीव ठेवण्याची शिफारस करावी लागते आहे. 'जात' ही आता पूर्वीसारखी जात न राहता दबाब गट म्हणून काम करत असल्याने ही शिफारस अटळ आहे. असो.

विज्ञान व मानव्यशास्त्राप्रमाणे कलाशिक्षणाचा पाया हा शालेय जीवनात घातला गेला पाहिजे. त्यासाठी दोन गोष्टी तातडीने करणे आवश्यक आहे (१) साहित्याची विस्थापना, (२) समीक्षेची विस्थापना. साहित्याच्या विस्थापनेविषयी मी मागे लिहिले आहेच. हिंदी किंवा इंग्रजी ह्यांचा अभ्यासक्रम हा वाङ:मय म्हणून तयार न करता भाषा शिकवणे ह्या दृष्टिकोनातून करणे आवश्यक आहे. मराठीचा अभ्यासक्रम मात्र भाषा शिकवणे म्हणून न करता मराठी कला शिकवणे ह्यासाठी तयार करणे आवश्यक आहे. आज सर्वसाधारणपणे तो वाङ:मयकेंद्रीत आहे आणि भाषा शिकवणे हाच त्याचा उद्देश आहे म्हणूनच साहित्याची विस्थापना होणे आवश्यक वाटते. त्यामागची कारणे मी मागेच दिली आहेत. मराठीची पाठ्यपुस्तके आणि त्यावरच्या प्रश्नप्रत्रिका पाहिल्या की ती किती समीक्षाप्रधान आहेत हे कुणाच्याही लक्षात येईल. आज जगभरच हा खेळखंडोबा चाललेला दिसतो. वास्तविक चित्रकला शिकताना आपण मुलांना प्रत्यक्ष चित्रे काढायला सांगून त्यांना चित्राचे गुण देतो. संगीत किंवा नृत्य शिकताना आपण मुलांना प्रत्यक्ष

गायला सांगून किंवा नाचायला सांगून त्या गाण्याचे किंवा नृत्याचे गुण देतो; मग वाङ:मयात आपण प्रत्यक्ष मुलांना वाङ:मय लिहायला सांगून, कविता लिहायला सांगून, त्याचे गुण का देत नाही ? आपण चित्रकलेत इतरांनी काढलेली चित्रे मुलांना आस्वादायला सांगून त्यांना त्यावर प्रश्न विचारत नाही संगीत किंवा नृत्यकलेत इतरांना गायला किंवा नाचायला सांगून मुलांना त्यांचा आस्वाद घ्यायला सांगून त्यावर प्रश्न विचारत नाही, मग साहित्याबाबतच इतरांचे साहित्य आस्वादायला सांगून त्यावर प्रश्न का ? मुले जर स्वत: चित्रे काढू शकतात, नाचू शकतात, गाऊ शकतात, तर ती तशीच कविता करणार नाहीत, कथा लिहिणार नाहीत म्हणून कोणत्या दीडशहाण्याने तुम्हाला सांगितले ? गेली शेकडो वर्षे मुलांना साहित्य निर्माण करायला सांगण्याऐवजी साहित्याचा आस्वाद घ्यायला शिकवले जात आहे ही समीक्षेची दादगिरी आहे नाही तर काय आहे ? शेकडो वर्षे हा मूर्खपणा चालला आहे आणि आम्ही कलावंत लोक तो मूर्खासारखा पहात आहोत. साहित्यातले प्रश्न हे 'टीकास्वंयवर' सारखी पुस्तके लिहून सुटणार  नाहीत तर पोरांना साहित्यात सृजनशील बनवून सुटणार आहेत. आम्ही गेली कित्येक शतके साहित्यातले प्रश्न हे समीक्षात्मक पातळीवर सोडवत आहोत म्हणूनच आज कलाक्षेत्रात सर्वात जास्त घोटाळे साहित्यात माजलेले दिसतात. वास्तविक सर्वात जास्त फोफावलेली कला हे साहित्याचे दृश्य दिसायला हवे होते कारण इतर कलांप्रमाणे ही कला महागडी नाही. तिला तांत्रिक साधने लागत नाहीत. साहित्य, गायन, नृत्य ह्या कला अशा आहेत की त्या कुठेही सादर केल्या जाऊ शकतात. माणूस कुठेही गाऊ शकतो, नाचू शकतो, तसेच माणूस कुठेही कविता करू शकतो; पण आम्ही माणसाला गाऊ, नाचू आणि लिहू न देण्याची शपथ घेतल्याप्रमाणे भंगार अभ्यासक्रम तयार करून बसलोय. हे चित्र जर बदलायचे असेल तर शालेय शिक्षणातच आपणाला काही क्रांतिकारक बदल करावे लागतील.

कलाविश्वात आपणाला खालील प्रकारच्या कलांचा समावेश प्रामुख्याने करायला मिळेल.

१) सौष्ठवकला : चित्र आणि शिल्प

२) मुद्राकला : नृत्य आणि अभिनय

३) घटनाकला : नाटक आणि चित्रपट

४) ध्वनिकला : संगीत

५) साहित्य : कविता आणि गद्य

शालेय पातळीवर चित्र आणि शिल्पापैकी शिल्प ही कला परिचित करून द्यावी. लहान

मुलांना चिखलात नाचायला आणि हुंदडायला आवडते. त्याच चिखलात नाचता नाचता मुलांना मातीची शिल्पे तयार करायला शिकवणे सोपे जाईल. शिल्पात तिसरी मिती प्रत्यक्ष असते तर चित्रकलेत ती भासात्मक असते आणि कृत्रिमरित्या निर्माण करावी लागते. त्यामुळे चित्रे ही जरा अधिक कष्टाची बाब आहे. मुले भोवताली त्रिमिती वस्तू पहात असल्याने ती निर्माण करणे त्यांना सहजसोपे जाईल. त्यामुळे पहिली ते चौथी शिल्पकला असावी आणि पाचवीनंतर चित्रकला शिकवावी. ही मातीची शिल्पे रंगवून घ्यावीत म्हणजे लहान मुलांच्या हाती ब्रश बसेल. पाचवी ते दहावी चित्रकला शिकवावी आणि शिल्पकलेबाबतही प्रोत्साहन द्यावे.

शालेय पातळीवर मुलांना अभिनय स्वतंत्र शिकवण्याऐवजी नृत्यातच अभिनय शिकवावा. ह्यावेळी भांगडा, गरबा, कोळी ही समूहनृत्ये शिकवावीत आणि मुलांना मनसोक्त नाचू द्यावे. ह्याचवेळी नाटक परिचित व्हावे. मुलांच्याकडून नृत्यनाटके बसवून घ्यावीत म्हणजे घटनाकलांचा परिचय होईल. चित्रपट परवडणारे नसल्याने चित्रपट फक्त दाखवावेत व त्यांचा रसास्वाद घेऊ द्यावा. चित्रपटांच्या पटकथा छापील असाव्यात. नृत्य शिकता शिकताच मुलांना तालाचा परिचय होऊन जाईल. पहिली-दुसरीला ताल अंगात भिनला की संगीतातील सूर तयार करून घ्यावे. तिसरी आणि चौथी ह्या दोन वर्षात सप्तकं तयार व्हायला हवीत. वर्गात नाटक बसवून घेणे अजिबात अवघड नाही. तिसरी-चौथीला 'इंग्रजी' पाठ्यपुस्तकांतून शिकवण्याऐवजी नाटकांतून शिकवणे केव्हाही चांगले. मुलांना संवाद काही वेळा पाठांतर करून तर काही वेळा त्यांच्याकडून लिहून घेऊन इंग्रजी शिकवणे सोपे जाईल. त्यामुळे इंग्रजी आणि रंगमंच ह्या दोन्ही विषयांची मुलांची भीड चेपेल. मराठीत संभाषणात्मक नाटकाऐवजी वाङ:मयीन नाटकावर भर द्यावा. ही नाटके मुलांकडून इम्प्रोवायझेशनच्या साहाय्याने बसवून घ्यावीत. त्यामुळे मुलांची संभाषणक्षमता आणि विचारक्षमता वाढेल. शालेय अभ्यासक्रमात निबंधासारख्या रुक्ष प्रकारचा समावेश प्राथमिक शाळेत नको. तिथे मुलाकडून कविता आणि कथा हे दोन वाङ:मयप्रकार लिहून घ्यावेत. दर महिन्याला दोन कविता आणि एक कथा लिहून घ्यावी. त्याचबरोबर डायरी लिहून आणायला सांगावी. ह्या कविता अर्थातच बालकविता आणि बालकथा असतील. ह्यावेळी वर्गात दर महिन्याला एक कथा आणि दोन कविता शिकवाव्यात. नाटक हा कलाप्रकार अजिबात वाङ:मयप्रकार म्हणून शिकवू नये इम्प्रोवायझेशनमधून मुले नाटक शिकत जातील. डायरी लिखाणाला अर्थातच गुण असावेत आणि ग्रेड देताना त्याचा हिशेब गृहीत धरावा. शिक्षकाने कविता कशी लिहावी, कथा कशी लिहावी हे सांगावे. प्रत्यक्ष कविता वर्गात निर्माण कराव्यात. त्यामुळे मुलांची भाषिक कार्यक्षमता वाढेल व भाषिक सृजनशीलताही वाढेल. चित्रपटांचे संवाद चित्रपट दाखवून वर्गातून

खेळ म्हणून म्हणवून घ्यावेत. मुलांना ते आवडेल. चित्रपट पाहून त्यावर मुलांना नाटक बसवायला सांगावे. ह्याचवेळी मुलांना काही मोजक्या चित्रपटांचे व नाटकांचे रसास्वादन असावे, तसेच दर महिन्याला दोन कविता आणि एक कथा शिकवावी. ह्यावेळी नृत्याचे तास हे सर्वसाधारणपणे शाळा सुटल्यावर घ्यावेत. नृत्याचा एक फायदा म्हणजे व्यायाम होईल आणि दुसरा फायदा सामाजिकरणाची सुरुवात होईल.

माध्यमिक शाळेत शिष्यांना चित्रकला परिचित करून द्यावी. चित्रकलेचा अभ्यासक्रम असा असावा, की दहावीपर्यंत शिष्य सर्व प्रकारची चित्रे हाताळू शकेल. शिल्पे अर्थातच कंटिन्यू राहतील. पाचवीला व्यक्तिगत नृत्याचा परिचय व्हावा. महाराष्ट्राला स्वत:ची अशी नृत्यकला नाही. माझ्या मते महाराष्ट्राने भरतनाट्यम हा नृत्यप्रकार मराठीकरण करून स्वीकारावा. भरतनाट्यमची वेषभूषा मराठी संस्कृतीला सहज मानवण्यासारखी आहे. मात्र ह्या नृत्यप्रकारात जी पदे वापरली जातात ती मराठी भाषेतील असावीत. एखाद-दुसरे पद हिंदी असावे. इतर भाषेतल्या पदांची शालेय पातळीवर गरज नाही. नृत्यकारांनी ज्ञानेश्वर-तुकाराम नृत्यासाठी का वापरू नयेत ? ह्याबाबतीत एकनाथ हा तर सर्वात जास्त उपयुक्त कवी आहे. एकनाथांची भारुडे भरतनाट्यमच्या फॉर्ममध्ये सहज सादर करता येतील. फक्त त्यासाठी आपल्या संगीतकारांनी आणि नृत्यकारांनी एकमेकांच्या डोक्याला डोके लावून बसले पाहिजे. अलीकडे काही नृत्यकार ज्ञानेश्वरांचे पसायदान सादर करतात. ह्याच धर्तीवर अनेक गोष्टी सादर करता येतील. शाहिरांच्या लावण्या. आपले लावणीनृत्य आणि भरतनाट्यम ह्यांच्या मिलाफातून लावणीनाट्यम असा पूर्णत: मराठी नृत्यप्रकार अस्तित्वात आणणे अशक्य नाही. आम्ही लोक बिनडोकपणाने अनुकरण करत असल्याने आपल्या वाटा बंद झालेत. एकीकडे नृत्याला मराठी प्रेक्षक नाही अशी ओरड आहे. (ती खरीही आहे) तर दुसरीकडे नृत्याचा मराठी संस्कृतीशी काही परिचय नाही. जर आपण लावणीनाट्यम आणि लावणी ऑपेरा अभंगनाट्यम किंवा अभंगऑपेरा (उदा. तुकारामाचा सामान्य माणूस ते मोक्षापर्यंतचा प्रवास भारतीय ऑपेरातून सहज सादर करता येईल) याचे प्राथमिक धडे माध्यमिक शाळेत दिले तर मुले आपोआपच नृत्याची चांगली आस्वादक होतील. सार्वजनिक ठिकाणी नाचायला शिकतील आणि युवागृहात जेव्हा नाचायला एकत्र येतील तेव्हा प्रेमात पडून प्रेमही करायला लागतील. आज भारतीय माणसाची अवस्था अशी आहे की, त्याला धड प्रेमही करायला मिळत नाही किंवा येत नाही. (आमच्या एका मैत्रिणीच्या मते भारतीय तरुणांना अजून साधे चुंबन कसे घ्यायचे तेही कळत नाही. बहुतेक भारतीय तरुण हे फक्त ओठापासून ओठापर्यंतच चुंबन घेतात. जीभ नावाचा एक अवयव चुंबनात वापरायचा असतो

आणि तोही पूर्णपणे हे त्याला कळायला सहा महिने लागतात किंवा सांगितल्याशिवाय कळतच नाही. खरंतर बायकांची स्थितीही फारशी वेगळी नाही.) एकेकाळी जगाला कामशास्त्र शिकवणारा हा देश स्वत: मात्र दिवाळखोर बनलाय; कारण त्याचे नृत्याशी असलेले नाते पूर्णपणे तुटले आहे. नृत्य हा तुमच्या देहाची साक्षात जाणीव करून देणारा कलाप्रकार आहे. माध्यमिक शाळेत ही देहाची देह म्हणून जाणीव रुजली की मुलेमुली आपोआप व्यायाम करायला लागतील; कारण बॉडी शेपमध्ये ठेवणे किती आवश्यक आहे हे नृत्य करताना जेवढे कळते तेवढे अन्य कशानेही कळत नाही. व्यायामावर व्याख्याने देण्यापेक्षा नृत्य शिकवणे हे जास्त फायद्याचे आहे. माध्यमिक शाळेत सातवीपर्यंत गरबा. भांगडा ह्या नृत्यात शिष्य तयार होतील, ह्याशिवाय आदिवासींच्या नृत्यप्रकारांतून काही सामूहिक नृत्ये आपल्याला विकसित करता येतील. ही आदिवासी नृत्ये आणि पाश्चात्त्य सामूहिक नृत्ये ह्यांच्या संयोगातून पुढे आणखी काही नृत्ये जन्मतील. नृत्ये शिकताना ताल भिनत जाईल. पाचवी ते दहावी शास्त्रीय संगीत दरवर्षी थोडे थोडे करून घ्यावे. दर वर्षी दोन राग झाले तरी खूप झाले. प्रत्येक टर्मला एक राग शिकवणे अजिबात अवघड नाही. ह्याच काळात हिंदी आणि इंग्रजीची संवादात्मक तयारी नाटकाद्वारे करून घ्यायला हवी . उदा. पुस्तकविक्रेता आणि ग्राहक ह्या दोन भूमिका. तुम्ही पुस्तके घ्यायला जाता हा विषय देऊन मुलांच्याकडून इथे वाक्यरचना तयार करणे आणि उच्चारणे अशा दोन्ही क्रिया सहज करून घेता येतील. मराठीत मात्र अवघड विषय द्यायला हवे. इतिहासातले अनेक प्रसंग इथे नाटकाद्वारे जिवंत करता येतील. भूगोलातले, विज्ञानातले काही सीन बसवता येतील उदा. प्रत्येक मुलाला एकेका खडकाचा किंवा एकेका खण्डाचा रोल द्यायचा किंवा कर्नाटकी माणसाचा, मद्रासी माणसाचा रोल द्यायचा. चित्रपटांच्या तांत्रिक अंगांची माहिती द्यायला सुरुवात करावी. आठवी ते दहावी ह्या तीन वर्षात संपूर्ण शॉट डिव्हिजन तयार करून घ्यावी व चित्रपट दाखवताना चित्रपटाची शॉट डिव्हिजन उलगडून दाखवावी. दरवर्षी दोनच चित्रपट अभ्यासक्रमात ठेवले तरी खूप झाले. पथेरपांचालीसारखे चित्रपट ह्याबाबतीत उपयुक्त आहेत. मात्र त्यांचे डबिंग मातृभाषेत करून घ्यावे. आज शाळा हे एक आनंददायी ठिकाण होण्याऐवजी एक रुक्ष ठिकाण झाले आहे. कारण आयुष्यात उत्साह निर्माण करणाऱ्या सृजनात्मक गोष्टीच तिथे विद्यार्थ्यांच्या जीवनात घडत नाही. विज्ञान काय किंवा मानव्यविज्ञान काय, दोहोतील सृजनशीलता ही उशिरा सुरू होणारी गोष्ट आहे. आणि ती थोडी रुक्ष आहे. कलात्मक सृजनशीलता ही आनंददायी असल्याने विद्यार्थी आनंदी राहतील आणि त्याचा फायदा विज्ञान व मानव्यविज्ञानालाही होईल. साहित्य शिकवताना कविता आणि कथाच निर्माण करायला सांगाव्यात. मात्र आता बालकविता व बालकथांबरोबर

भोवतालच्या आयुष्यातून कविता लिहायला प्रोत्साहन द्यावे. प्राथमिक शाळेत ज्या कविता पाठ करून घेतल्या त्या आता उपयोगाच्या नाहीत. आता वृत्ते प्रत्यक्ष न शिकवता सर्व प्रमुख वृत्तातील (अर्थात प्रचलित) एकेक कविता तोंडपाठ करून घ्यावी . पाचवी ते सातवी ह्या तीन वर्षात तीस कविता पाठ करून घ्यावात. तोंडी परीक्षेत संपूर्ण कविता म्हणायला सांगावी . कथा पाठ करून घेऊ नयेत. त्या शिकवाव्यात; मात्र त्याचे प्रमाण मुलांनी निर्माण केलेल्या कथेइतकेच असावे. पाचवी ते सातवी ह्या तीन वर्षात मुलांकडून तीस कविता निर्माण व्हाव्यात. पंधरा कथा निर्माण व्हाव्यात. पंधरा पत्रे लिहून व्हावीत. आठवीला प्रथम व्याकरणाची ओळख करून द्यावी. ह्याचवेळी वर्तमानपत्रातील बातम्यांचे लेखन परिचित करावे, त्याचबरोबर नववीला निबंध लिहून घ्यावेत. कवितांची संख्या दर वर्षाला दहा अशीच ठेवावी. कथा पाच आणि दहा बातम्या आठवीला तर कथा पाच व दहा निबंध अशी नववीला तयारी करून घ्यावी. दहावीला पाच कथा, दहा निबंध, मराठीचे व्याकरण, दहा कविता एवढी निर्मिती करून घ्यावी. आस्वादात्मक प्रश्नांना पूर्ण फाटा द्यावा. परीक्षेतही विषय देऊन कविता, कथा आणि निबंध लिहायला सांगावे. व्याकरणाला २५ टक्के वजन असावे. मात्र विषयांची निश्चिती देऊ नये व मुलांच्या कविता, कथेतले नावीन्य ह्यांना वजन द्यावे. आज टीव्ही हे केवळ माध्यम म्हणूनच नाही किंवा माहितीचे केंद्रच म्हणूनच काम करत नाही तर ग्राहक तयार करण्याचे कामही करत आहे. नवीन नवीन मानसिक गरजा, वस्तूंच्या गरजा निर्माण करणे हे जाहिरातीचे मोठे काम आहे. त्यामुळे माणसाची सुबत्तेची मागणी वाढत जाणार. त्याचा एक फायदा लोकसंख्या घटण्यात होणार असला तरी (गरजाच इतक्या वाढवून ठेवल्या जातील की एकच मूल सांभाळणे ह्यापुढे आईबापांना परवडेल) एक कृत्रिम मानसिकता आणि कृतक चौकसपणा ह्यातून तयार होण्याचा धोका आहे. तो टाळायचा असेल तर टीव्ही बंद करून चालणार नाही तर चित्रपटाच्या शॉट डिव्हिजन्स शिकवता शिकवता जाहिरातींचा चिकित्सक अभ्यासही मुलांकडून झाला पाहिजे. म्हणूनच वर्तमानपत्राच्या बातम्या तयार करण्याच्या कार्यक्रमाबरोबरच जाहिराती व त्यांची भाषा निर्माण करायला शिकवणे हेही आपले उद्दिष्ट असले पाहिजे. मुले स्वत:च जाहिराती तयार करतील तेव्हा टीव्हीवरील जाहिरातीतील बनावटगिरी त्यांच्या लक्ष्यात येईल. त्यामुळेच चित्रपटाचा रसास्वाद शिकवता शिकवता दर वर्षी तीन जाहिराती तयार करण्याचे कामही मुलांना द्यावे. प्रत्यक्ष शूटिंग शक्य नसले तरी त्यांच्या संहिता तयार करून घ्याव्यात. आपल्याला ज्या मुलांना शिकवायचे आहे ती टीव्हीत वाढणारी पिढी आहे हे लक्षात ठेवूनच ह्यापुढील शिक्षणपद्धती तयार कराव्या लागतील. कलात्मक सृजनशीलता निर्माण करणे हाच ह्या जगात आणि मुलात विवेकशीलता निर्माण करण्याचा प्राथमिक

उपाय आहे. चहुबाजूला स्पर्धा आणि जाहिरातबाजी वावरत ठेवणाऱ्या ह्या दुनियेत शाळा हेच आपले एकमेव हत्यार आहे हे लक्षात घेतले पाहिजे. म्हणूनच शाळेत शारीरिक शिक्षण शिकवताना नुसत्या कवायती घेऊन चालणार नाही. तर हे तास ध्यानाचे केंद्र बनायला हवेत. व्यायाम, ध्यान आणि नृत्य ह्या त्रयीवर आपण शरीर उभे केले तरच मुलांच्या आयुष्यात लय निर्माण होईल. आज सर्व जगात अमेरिकेचा शरीरकेंद्री दृष्टिकोन वाढत चाललेला दिसतो. हा मार्ग एकांगी आहे. अमेरिका हे आत्मा नसलेले सांस्कृतिक शहर आहे. ते आपणाला परवडणारे नाही. आपणाला आत्म्याचा विचार करायला हवा. गुर्जिफ म्हणायचा की माणसाला आत्मा वगैरे असत नाही तो निर्माण करावा लागतो. ह्याच धर्तीवर म्हणता येईल माणसात ईश्वर वगैरे काही असत नाही, तो माणसात निर्माण करावा लागतो. आज ह्या गोष्टी निर्माण करण्याचे काम टीव्ही जास्त करतोय. आपण त्याचाच वापर करून ईश्वर निर्माण केला पाहिजे. आज अमेरिकेची जी चैन चाललीये, जी जीवनपद्धती चाललीये ती एकटी अमेरिका जिची लोकसंख्या जगाच्या केवळ चार टक्के आहे, जगातील तब्बल चाळीस टक्के नॅचरल रिसोर्सेस वापरत असल्याने चाललीये. उद्या सर्वच जग अमेरिका बनले तर प्रत्येकाला चाळीस टक्के रिसोर्सेस मिळणे शक्य नाही. आणि मग मारामाऱ्या आणि युद्धे अटळ आहेत. माझा तर स्वतःचा अंदाज असा आहे की, अमेरिका ज्या पद्धतीने स्वतःची निसर्गसंपत्ती शाबूत ठेवून इतरांची वापरत आहे ते बघता एकविसाव्या शतकात केवळ अमेरिकेजवळच नैसर्गिक संपत्ती असेल आणि सारे जग अमेरिकेवर आक्रमण करेल. अमेरिकेच्या हे लक्षात आलेले दिसत नाही, म्हणून जगभर आज अमेरिकी जीवनशैलीचा धिंगाणा पसरत चाल्लाय. तो पसरावाही. त्यातील गतीचे तत्त्व आपण घ्यावे पण त्यांची गती स्पर्धेतून निर्माण होते. अहंकारातून निर्माण होते, आपली गती उत्साहातून निर्माण व्हायला हवी. ध्यानातून निर्माण व्हायला हवी. आनंदातून निर्माण व्हायला हवी. अमेरिका हे भयग्रस्त वास्तव आहे म्हणूनच ते रॅम्बोच्या शोधात असते. आपले वास्तव हे दुःखग्रस्त आहे. त्याने बुद्धच शोधला पाहिजे. आणि हा बुद्ध आपल्याला आपल्यातून निर्माण करावा लागेल. आज जगभर ह्या दोन्ही स्थिती संमिश्र स्वरूपात उगवल्या आहेत. रॅम्बो की बुद्ध असा हा पर्याय आहे आणि मला वाटते जगाने बुद्धाची निवड करावी. रॅम्बो ही दुःखाविरुद्ध, भयाविरुद्ध लढण्याची शारीरिक पद्धत आहे. बुद्ध ही भयावरची, दुःखावरची संपूर्ण औषधी उपाययोजना आहे. रॅम्बो ॲलोपिथिक ट्रीटमेन्ट आहे. तिथे रोगी बरा करण्यावर भर आहे. तिला भरपूर साईड इफेक्टस आहेत. बुद्ध आयुर्वेदिक औषधोपचार आहे. तिथे रोगी रोगापासून मुक्त करण्यावर भर आहे. प्रिव्हेन्शन इज बेटर दॅन क्युरिंग हे त्याचे तत्त्व आहे. त्याला साईड इफेक्टस नाहीत. मात्र आपला बुद्ध हा विसाव्या शतकातील बुद्ध असला

पाहिजे. तो श्रीकृष्णासारखा बासरी वाजवणारा, गवळणींबरोबर नाचणारा, शृंगार करणारा, मित्रांच्यात उंडारणारा, फुटबॉल आणि बुद्धिबळ एकाच दिवशी खेळणारा, टीव्ही पाहणारा आणि त्याला जेव्हा वाटेल तेव्हा टीव्हीचा मोह टाळून ध्यानात जाणारा, फळाची अपेक्षा न ठेवता कर्म करणारा आणि बुद्धीची नैतिकता प्राणपणाने जपणारा, करुणेने भारलेला आपल्या अस्तित्वाच्या गोवर्धनाखाली सर्व विश्व नांदवणारा, गाडीचे सारथ्य करणारा पण ही गाडी ज्या निसर्गावर चाललीये त्या निसर्गाचा व्यवस्थित खरारा करणारा, त्याची जातिवंत घोड्याप्रमाणे काळजी घेणारा असा हा श्रीकृष्ण बुद्ध असला पाहिजे. हा बुद्ध आपल्या शिक्षणपद्धतीचे ध्येय असले पाहिजे. आणि त्याची पायाभरणी शाळेतच होऊ शकते. शारीरिक शिक्षणात शारीरिक शिक्षणव्यवस्थेबरोबर ध्यानाचे शिक्षण दिले तरच हे शक्य आहे. आम्हा भारतीयांच्या मनात ध्यानाबद्दल एक चमत्कारिक न्यूनगंड आहे किंवा खोटा अभिमान तरी आहे. ह्या दोन्ही गोष्टी बऱ्या नव्हेत. ध्यान हा एक शोध आहे आणि तो प्रत्येकाने घ्यावा. त्याची प्राथमिक तयारी शाळेत घालून द्यावी. त्यासाठी आवश्यक असणारी योगासने शिकवावीत. चौथीपर्यंत योगासने व त्यानंतर पाचवी ते दहावी ध्यान असा अभ्यासक्रम असायला हवा. आपण मुलांच्या शरीराकडे अजिबात लक्ष न देता त्यांच्या डोक्यात केवळ माहिती कोंबत असतो. त्याने तो मुलगा माहितीला कंटाळतो. ही माहिती कोंबण्यापेक्षा मुलाची माहिती गोळा करण्याची, ती व्यवस्थित व्यवस्थापित करण्याची आणि त्यातून शास्त्रीय निष्कर्ष काढण्याची कौशल्ये आपण वाढवायला हवीत. त्यासाठी मुलांची शरीरे उत्साहाने भरलेली हवीत आणि हा उत्साह नृत्य, व्यायाम आणि ध्यान ही त्रयीच देऊ शकेल.

अकरावी-बारावी-तेरावीला कला महाविद्यालयात सहा विषय असतात. त्यातील पाच हे (१) साहित्य (२) मुद्रा (३) सौष्ठव (४) संगीत (५) घटना अशा पाच कलांशी संबंधित हवेत. ह्या तीन वर्षात सर्वच कलांचे फौंडेशन घालून द्यायला हवे. सहाव्या विषयात हिंदी-इंग्लिश यांचा संयुक्त अभ्यासक्रम असायला हवा. त्यात हिंदीतील व इंग्रजीतील कविता-कथा असाव्यात व सर्व कलांशी संबंधित असे निबंध असावेत. अकरावी-बारावी आणि तेरावीला संपूर्ण व्याकरण तयार करून घेऊन मुलांना हिंदी व इंग्लिशमध्ये शास्त्रशुद्ध बोलणे आणि लिहिणे जमेल ह्याची काळजी घ्यावी. इथेही आकलनात्मक बाजूपेक्षा सृजनात्मक बाजूवर भर असावा आणि मराठी साहित्याचे इंग्रजी व हिंदीमध्ये भाषांतराची तयारी करून घ्यावी. मुलांना हिंदी व इंग्रजीत साहित्यनिर्मिती करायला लावावी. साहित्यात ह्या तीन वर्षी तीन कादंबऱ्या आणि पंचेचाळीस कविता निर्माण करण्याचे ध्येय असायला हवे. ह्या सर्वच पाचही कलांचे विज्ञान व समाजशास्त्र ह्यांची ओळख ह्याच वर्षी व्हायला हवी. उदा. साहित्याचे भाषाविज्ञान आणि साहित्याचे

समाजशास्त्र ह्या तीन वर्षांत मूलभूत पातळीवर शिकवावे. त्यांचे फौंडेशन घातले जावे. साहित्यात ज्या तीन कादंबऱ्या लिहून घेतल्या जातील त्यातील पहिली स्वतःच्या कुटुंबावर (किंवा जिथे विद्यार्थी वाढला असेल तेथील), दुसरी त्याच्या स्वतःच्या आयुष्यावर आणि तिसरी त्याच्या गल्लीवर किंवा इमारतीवर किंवा गावावर अशी असावी. पंचेचाळीस कविता ह्या वयात सहजच जमून जातील. ह्याच काळात तीन कवी आणि तीन कादंबऱ्या अभ्यासक्रमात लावल्या जाव्यात. एक संत कवी, एक मर्ढेकरी पिढीतील आणि एक देशी परंपरेतील असावे किंवा संपूर्ण पिढीचे संकलन असावे. संतांच्या, मर्ढेकरी परंपरेच्या आणि देशी परंपरेच्या उत्तम पंधरा कविता त्यात असाव्यात. वाङ्मयाच्या इतिहासाची भानगड अभ्यासक्रमात असू नये. त्याने काहीही साध्य होत नाही. फक्त घोकंपट्टी होते. ह्याचबरोबर अकरावीला कुटुंबकेंद्रित (उदा. करुणाष्टक-माडगूळकर) बारावीला आत्मचरित्रात्मक किंवा आत्मशोधात्मक (उदा. कोसला : नेमाडे, उपरा : माने), तेरावीला भोवतालच्या वास्तवतेशी निगडित (उदा. कोल्हापूरच्या शिवाजी विद्यापीठात झोंबी : आनंद यादव तर मुंबई विद्यापीठात वैतागवाडी : भाऊ पाध्ये) अशा कादंबऱ्या लावाव्यात. विद्यार्थ्यांसाठी ह्या कादंबऱ्यांवर चर्चासत्रे आयोजित करावीत. त्यात कलावंतांनी भाग घ्यावा. विद्यार्थ्यांनी प्रश्न मांडावे. मुद्रांच्यामध्ये भरत नाट्यमचा मूलभूत पाया पूर्णतः शिकवावा आणि भरताच्या नाट्यशास्त्रातील अभिनय-शाळेची तयारी करून घ्यावी. संगीतात बेसिक्स पूर्ण घटवून घ्यावीत. चित्रकलेत, शिल्पकलेत सर्व प्रकारची चित्रे आणि शिल्पे त्यांच्या तंत्रासहित घटवून घ्यावीत. चित्रपटाबाबत शॉट डिव्हिजन्स सखोल तयार करून घ्याव्यात. कॅमेऱ्याची सर्व तांत्रिक अंगे विद्यार्थ्यांना शिकवावीत. रंगमंचावरील प्रकाश योजना, नेपथ्य ह्याबाबींचा पूर्ण परिचय करून द्यावा. कला क्षेत्रातील सर्व शिक्षण मराठी भाषेतून द्यावे. इंग्रजी आणि हिंदीची तयारी करून घ्यावी. ह्या काळात प्रत्येक ग्रूपकडून वर्षातून दोन नाटके बसवून घ्यावीत व त्यांचे प्रयोग गावभर किंवा शहरभर करावेत. नृत्य आणि गायनाचा एक संयुक्त कार्यक्रम तयार करून तो अनेक ठिकाणी सादर करावा.

महाविद्यालयीन पातळीवर चौदावी-पंधरावी व सोळावीचा अभ्यासक्रम हा पूर्णतः एक कलाप्रधान असावा. तेरावीनंतर विद्यार्थ्याने आपल्याला आयुष्यभर कोणत्या कलेत काम करायचे आहे ते ठरवावे आणि चौदावीला ती कला निवडावी. चौदावी-पंधरावी-सोळावी ही तीन वर्षे ही एका कलेच्या उपासनेत कलावंताने घालवावी. अकरावी, बारावी, तेरावी फौन्डेशन कोर्स असावा. चौदावी, पंधरावी, सोळावी ॲडव्हान्स अभ्यासक्रम असावा. ह्या तीन वर्षांत अठरा पेपर असावेत.

(१) विश्वकलांचा व कलातंत्राचा इतिहास, (२) भारतीय कला व कलातंत्राचा इतिहास,

(३) मराठी कला व कलातंत्राचा इतिहास, (४) कला व कलेचे विज्ञान (५) कला व दर्शन (तत्त्वज्ञान), (६) कला व मानव्यविज्ञान-१, (७) कला व मानव्यविज्ञान-२, (८) लोककला व कला, (९) कलेचे सौंदर्यशास्त्र.

असे नऊ पेपर थिअरीचे असावेत व ते त्या त्या कलेच्या संदर्भात असावे. इथे इतिहास शिकवताना त्या त्या काळातील तंत्राचाही परिचय करून देऊन ते तंत्र विद्यार्थ्यांकडून घोटवून यावे व त्यामागचे सर्व सामाजिक चलनवलन उलगडून दाखवावे. विश्वकलांच्या इतिहासात अर्थातच मराठी व भारतीय कला वगळाव्यात. जपान, चीन, फ्रान्स ह्यांना महत्त्व द्यावे. ब्रिटन हे कलेच्याबाबतीत एक दिवाळखोर राष्ट्र आहे हे लक्षात घ्यावे. प्रत्येक कलेबाबत दोन शाखा असाव्यात (१) शुद्ध कला, (२) व्यवहारिक कला (Applied Art) विद्यार्थ्यानि तेरावीनंतर आपणाला कुठे जायाचे आहे ते निश्चित करावे आणि त्या शाखेला प्रवेश घ्यावा. उदाहरणार्थ, चित्राच्याबाबतीत. एखादा पेन्टिंगला आला तर विश्वातील, देशातील, महाराष्ट्रातील पेन्टिंगचा, पेन्टिंगच्या तंत्राचा इतिहास, पेन्टिंग व विज्ञान, पेन्टिंगचे सौंदर्यशास्त्र, पेन्टिंग व भारतीय दर्शन, पेन्टिंग व पाश्चात्त्य तत्त्वज्ञान, पेन्टिंग व समाजशास्त्र, मानव्यशास्त्र, पेन्टिंग व अर्थशास्त्र, राज्यशास्त्र, लोककलेतील पेन्टिंग असे विषय हवेत. ह्या उलट एखाद्याला कमर्शियल पेन्टिंग किंवा आर्टकडे जावे वाटले तर तिचा इतिहास, तिचे सौंदर्यशास्त्र वगैरे विषय हवेत. संगीतात (१) शास्त्रीय संगीत, (२) शब्दप्रधान गायकी. नृत्यात (१) शास्त्रीय नृत्य, (२) व्यवहारिक नृत्य व अभिनय (ह्यात एखाद्याला सिनेमात किंवा तत्सम क्षेत्रात काम करायचे असल्यास अभिनेत्यांना जास्त उपयुक्त असेल) वाङ्मयात (१) अभिजात वाङ्मय, (२) व्यवसायिक वाङ्मय अशा दोन शाखा असतील. ज्यांना व्रतस्थपणे वाङ्मय निर्माण करायचे आहे त्यांना अभिजात वाङ्मय घेता येईल, तर ज्यांना भाषेचा व्यावहारिक वापर करायचा आहे, पत्रकार, संपादक, जाहिरातीचा लेखी मजकूर लिहून देणारे बनायचे असेल त्यांनी व्यावसायिक वाङ्मयकार बनावे. भाषांतर हा प्रकार दोन्ही बाजूना येईल. घटनाकलात (१) दिग्दर्शक, (२) कॅमेरामन, एडिटर, प्रकाश योजनाकार वगैरे तंत्रज्ञ अशा दोन शाखा कराव्यात.

उरलेले जे नऊ पेपर आहेत ते प्रत्यक्ष प्रॅक्टिस असतील. ह्यातील थिअरीवरचे पेपर हेही प्रॅक्टिसच असतील. उदा. लोकचित्रकलेचा पेपर शिकवताना त्या पद्धतीने, त्या तंत्राने विद्यार्थ्यांच्याकडून पेन्टिंग करून घ्यावीत. दरवर्षी तीन थिअरीचे पेपर, तीन प्रत्यक्ष कामाचे. त्यातील थिअरीचे पेपर हेही प्रत्यक्ष कामावरच आधारित असतील. उदाहरणार्थ, मराठी नृत्याच्या इतिहासात लावणी हे नृत्य आले तर त्याचा इतिहास ही काही केवळ वाचण्याची गोष्ट नसेल तर

प्रत्यक्ष लावणी नृत्य पेश करा असाच त्यामागचा प्रश्न असेल किंवा लोककलेतील गायन किंवा पेन्टिंग प्रत्यक्ष गा किंवा काढा असाच प्रश्न असेल. कला ही मूलत: कृती आहे. त्यामुळे प्रत्यक्ष कृती महत्त्वाची आहे. इथे भाषेबाबत धोरण स्पष्ट आहे. जगाचे कलातंत्र व इतिहास, कला व विज्ञान शिकवताना, कला व पाश्चात्त्य तत्त्वज्ञान शिकवताना इंग्रजी भाषा, भारतीय कला व तंत्रज्ञान, कला व मानव्यविज्ञान, कला व भारतीय तत्त्वज्ञान शिकवताना हिंदी भाषा, मराठी कला व कलातंत्र, लोककला व कलेचे सौंदर्यशास्त्र शिकवताना मराठी भाषा असे त्रिस्तरीय धोरण अवलंबावे. उरलेल्या नऊ पेपरची प्रत्यक्ष कामाची तयारी मराठी भाषेतूनच करून घ्यावी. थोडक्यात १२ पेपर मराठीतून, साडेतीन पेपर हिन्दीतून व अडीच पेपर इंग्रजीतून अशी तयारी असावी. ह्यातून कलावंताची भाषिक तयारीही उत्तम होईल. मानव्यविज्ञानात मानवशास्त्र, समाजशास्त्र, भूगोल, राज्यशास्त्र, अर्थशास्त्र आणि मानसशास्त्र ह्यांचा समावेश असावा.

आपणाला इथे प्रामुख्याने साहित्याचा विचार करावयाचा असल्याने त्याचा आकृतिबंध आपणाला खालीलप्रमाणे ठरवता येईल. थिअरीचे नऊ पेपर खालीलप्रमाणे असतील.

(१) विश्वसाहित्याचा व साहित्यिक तंत्राचा इतिहास

(२) भारतीय साहित्याचा व साहित्यिक तंत्राचा इतिहास

(३) मराठी साहित्याचा व साहित्यिक तंत्राचा इतिहास

(४) साहित्य आणि भाषाविज्ञान

(५) (अ) साहित्य आणि भारतीय दर्शन (ब) साहित्य आणि पाश्चात्त्य तत्त्वज्ञान

(६) साहित्य आणि समाजशास्त्र, मानवशास्त्र आणि मानसशास्त्र

(७) साहित्य आणि भूगोल : अर्थशास्त्र आणि राज्यशास्त्र

(८) लोकसाहित्य

(९)साहित्याचे सौंदर्यशास्त्र

उरलेले नऊ पेपर हे खालीलप्रमाणे असतील.

**(१) वाङ्मयप्रकारांचा घाट आणि आकार :** ह्यात सर्व वाङ्मयप्रकारांच्या फॉर्मविषयी सखोल विवेचन, तसेच संख्या, फॉर्ममधला फरक. ह्यात नाटक व चित्रपट पटकथेचाही समावेश असावा. वाङ्मय प्रकाराची शैली.

**(२) संवादशास्त्र :** सर्व प्रकारच्या संवादांची तयारी. संवादाचे सर्व प्रकार, संवादामागचे

भाषाविज्ञान, संवादाची तंत्रे, वेगवेगळ्या वाङ्मय-प्रकारातले संवाद. संवादशैलीशास्त्र, संवादातून निर्माण होणारी व्यक्तिरेखा व भावनिर्मिती.

**(३) निवेदनशास्त्र :** साहित्यातील निवेदने, आत्मनिवेदनापासून वस्तुनिष्ठ निवेदनापर्यंतचे सर्व प्रकार. अवकाशाचे तपशील मांडण्याच्या पद्धती. निवेदनशैलीशास्त्र, निवेदनातून निर्माण होणारे व्यक्तिरेखन व भाव.

**(४) माहितीशास्त्र :** साहित्यिकाने गोळा करावयाची माहिती व तिचे व्यवस्थापन. ती साहित्यात कशी वापरावी त्याचे ज्ञान. व्यक्तिरेखेचा भूतकाळ व भविष्यकाळ व वर्तमानकाळ यांची पूर्ण माहिती व त्यामागचे मानसशास्त्र, भावांची पूर्ण ओळख.

**(५) व्याकरणशास्त्र :** मराठीचे व्याकरण, साहित्यातील व्याकरणाचे महत्त्व व व्याकरणाची होणारी मोडतोड, शब्दनिर्मिती, शुद्धलेखन.

**(६) तंत्रज्ञानशास्त्र :** साहित्याचे प्रत्यक्ष तंत्रज्ञान, टाईपचे प्रकार, पुस्तक बाईंडिंग, वितरण, साहित्यातील सेन्सॉरशिप, चित्रपटाची व नाटकाची तंत्रे, त्यांचे महत्त्व.

**(७) भाषांतरशास्त्र :** भाषांतरे, त्याची तंत्रे व मंत्रे

**(८) शब्दशास्त्र :** शब्दाची निर्मिती. भाषेची निर्मिती, शब्दांची निवड, शब्दांचे सांस्कृतिक संचित, शब्दांची अर्थक्षमता.

**(९) दोन भाषा :** हिन्दीखेरीज दुसरी भारतीय भाषा व इंग्रजीखेरीज दुसरी विश्वभाषा ह्यात शिकवावी. प्रत्येकी सहा महिन्यांचा हा कोर्स असावा.

व्यावसायिक साहित्यामध्ये हेच विषय ठेवायला हरकत नाही. पण ह्यात पत्रकारांना व जाहिरात कर्त्यांना महत्त्व असावे. ललित साहित्य दुय्यम असावे. उदा. वाङ्मयाच्या इतिहासात पत्रकारितेचा व जाहिरातींचा इतिहास व त्याची तंत्रे असावीत. भाषाविज्ञानात जाहिरातीच्या व बातम्यांच्या भाषेवर भर द्यावा. निवेदनशास्त्रात वृत्तांत तर संवादशास्त्रात जाहिरातीतील संवादावर, मुलाखतीवर, तिच्या मांडणीवर भर हवा. तत्त्वज्ञान, मानव्यविज्ञान यांची पूर्ण ओळख करून द्यावी. वाङ्मयीन प्रकारात जाहिरातींचे, बातम्याचे प्रकार, त्यांचे घाट, निबंधाचे प्रकार व घाट, वृत्तांतांचे प्रकार व घाट ह्यावर भर हवा. लोककलेच्या ऐवजी पब्लिक कम्युनिकेशन हा विषय शिकवावा. लोकसंस्कृतीचे सखोल अध्ययन करून घ्यावे. सौंदर्यशास्त्रात बातमी म्हणजे काय, जाहिरात म्हणजे काय, ती का निर्माण होते, तिची प्रयोजने, तिचा परिणाम वगैरे गोष्टींची चर्चा असावी. माहितीशास्त्रात बातमी कशी गोळा करावी, माहिती कशी, जमवावी तिचे विश्लेषण

करसे करावे, बातमीतल्या, जाहिरातीतल्या कुठल्या माहितीला उठाव द्यावा, कुठली माहिती दुय्यम मानावी, बातमीतली, जाहिरातीतली कुठली माहिती जास्त बिंबवावी वगैरे गोष्टी शिकवाव्यात. व्याकरणशास्त्रात व्याकरण व शुद्धलेखन शिकवावे. तंत्रज्ञानशास्त्रात फोटोग्राफी, टायपोग्राफी, मशिनरी, सिने-कॅमेऱ्याची तंत्रे, परिच्छेदांची मांडणी, कॉलमची मांडणी वगैरे बाबी याव्यात. भाषांतरशास्त्रात जाहिरातींची, बातम्यांची भाषांतरे तंत्रे वगैरे तर शब्दशास्त्रात शब्दाची निवड वगैरे. ह्याशिवाय इतर दोन भाषा शिकाव्यात अशी रचना असावी. प्रत्येक महाविद्यालयाने स्वत:चे एक वर्तमानपत्राच्या आकाराचे साप्ताहिक, पाक्षिक किंवा मासिक चालवावे व त्याची जबाबदारी विद्यार्थ्यांवर टाकावी. त्यासाठी लागणाऱ्या जाहिराती विद्यार्थ्यांनीच गोळा कराव्यात आणि जाहिरातींचे डिझाईन पण विद्यार्थ्यांनी करावे. ह्याचबरोबर इतर महाविद्यालयातील मॅगेझिन्सची डिझाईनची कामे आपल्या अंगावर घ्यावीत.

ह्याच धर्तीवर इतर कलांची मांडणी करणे सहज सोपे आहे. आपल्याला नेमके काय साधायचे आहे हे कळाले की अभ्यासक्रम तयार करणे अवघड जात नाही. आपल्या डोक्यात आपल्याला नेमके काय पाहिजे ते स्पष्ट असले की सोपे जाते.

एक गोष्ट इथे जाता जाता लक्षात ठेवायला हवी अभ्यासक्रम राबवताना त्या त्या एरियाच्या स्वत:च्या अडचणी असतात. त्यानुसारच त्यांनी मांडणी करायला हवी. उदाहरणार्थ, सुट्ट्यांची मांडणी. उत्सवांना आणि सणांना सुट्ट्या आवश्यक हे मागेच सांगितले आहे. पण सहामाही, दिवाळीची सुटी व वार्षिक सुटी ही तिथली तिथली परिस्थिती पाहूनच द्यावी. केवळ ब्रिटिश त्या काळात सुट्ट्या घेत म्हणून आपण घ्यायची ह्याला काही अर्थ नाही. अनेक ठिकाणी पीकपाण्याशी संबंधित सुटी ठेवणे आवश्यक आहे. उदाहरणार्थ, कापणीच्या वेळी गावात अनेकांना कामावर जावे लागते. तेव्हा सुटी देणे आवश्यक आहे. काही ठिकाणी पावसाळ्यात नदीला पूर येतो तेव्हा शाळा बन्द असते. आपले लोक एवढे निर्बुद्ध आहेत की काही ठिकाणी मे-जून सुटी आणि नंतर नदीला पूर आलाय म्हणून जुलै ते सप्टेंबर सुटी व नंतर कापणीसाठी दोन महिने मास्तर गायब असा प्रकार चालतो. अशा वेळी मे-जून सुटी रद्द करून दिवाळीची सुटी पाच दिवसांची करून नदीला पूर येईल तेव्हा सुटी देणे आवश्यक आहे.

लोककलेच्या पेपरमध्ये तिथल्या स्थानिक लोककलांचा अभ्यास महत्त्वाचा आहे. शिवाजी विद्यापीठाने अंबाबाईच्या गोंधळाकडे लक्ष द्यावे. तर मुंबई विद्यापीठाने वारल्यांना महत्त्व द्यावे. कला शिकवताना प्रत्यक्ष सृजनच महत्त्वाचे मानावे. सिद्धांतन आकलनासाठी असावे. साहित्याची पदवी घेऊन बाहेर पडणारा विद्यार्थी हा परीक्षा देऊन बाहेर पडता कामा नये, तर प्रत्यक्ष ज्ञानाचा

वापर करून त्याने तीन वर्षात तीन कादंबऱ्या, पंचेचाळीस कथा, पंचाहत्तर कविता, एक नाटक, एका चित्रपटाची पटकथा व एका कलाकृतीचे भाषांतर एवढी निर्मिती करायला हवी व त्याचे मूल्यमापन (इथे गुण देऊ नये, ग्रेड द्यावी) ह्या निर्मितीवरून व्हायला हवे. हीच गोष्ट व्यावसायिक साहित्याबाबत आहे. त्याने निर्माण केलेल्या सहाशे बातम्या, दीडशे लेख, शंभर जाहिराती, शंभर बातम्यांची व जाहिरातींची भाषांतरे, भाषांतरित जाहिरात लेख व निबंध, पन्नास मुलाखती, पंधरा वृत्तांत ह्यावरून त्याचे मूल्यमापन करावे.

दुसरी महत्त्वाची गोष्ट इंग्रजी भाषेच्या आक्रमणाविरुद्ध तोंड द्यायचे असेल तर मराठी शाळांचा शैक्षणिक दर्जा प्रचंड सुधारलाच पाहिजे, पण त्याचबरोबर मराठी शाळांनी मुलांच्या बसेसची सोय, अद्ययावत प्रयोगशाळा व कलाशाळा निर्माण करायला हव्यात. आज अनेक पालक आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमात घालतात कारण इंग्रजी माध्यमाच्या शाळांत ह्या सोयी आहेत. अर्थात ह्याचा अर्थ अशा सोयी सर्वच इंग्रजी शाळांत आहेत असे नाही. अलीकडे इंग्रजी माध्यमात पैसा मिळतो म्हटल्यावर अनेक भुरटे लोक ह्या धंद्यात शिरलेले आहेत. विशेषत: तालुक्याच्या ठिकाणी कित्येक शाळा अशाआहेत की जिथे स्कूलना बसेस आहेत, पण प्रयोगशाळेत पुरेशा मायक्रोस्कोप्सचा पत्ता नाही आणि तरीही पालक केवळ आपल्या स्टॅंडर्ड ऑफ लिव्हिंगचा खोटा भपका दाखवण्यासाठी, उच्चभ्रूपणा सिद्ध करण्यासाठी आपल्या पाल्याला आज इंग्रजी माध्यमात घालत आहेत. काही ठिकाणी भोवतालच्या सर्व मुलांनी इंग्रजी माध्यमात प्रवेश घेतल्यामुळे पाल्याला जर चांगल्या मुलांची कंपनी मिळायची असेल तर इंग्रजी माध्यमात घातले पाहिजे अन्यथा त्याला मराठी माध्यमात शिकणाऱ्या खालच्या वर्गातल्या मुलाबरोबर शिकावे लागेल आणि पाल्य त्यामुळे बिघडेल अशी भीती असते आणि ह्या भीतीपोटी पाल्याला इंग्रजी माध्यमात घातले जाते. आज कळत नकळत इंग्रजी माध्यम हे 'आहे रे' ह्या वर्गात मोडणारे तर मराठी माध्यम 'नाही रे' च्या वर्गात मोडणारे बनले आहे. आज मुंबईत पाचसहा हजार रुपये महिना कमावणाऱ्या वेश्यांनीदेखील आपली मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घातलेली दिसतात. यातील सर्वात दुर्दैवाची आणि शरमेने लाज खाली घालायला लावणारी बाब म्हणजे बहुतेक मराठी साहित्यिक व मराठी प्राध्यापक-शिक्षकांची मुले आज इंग्रजी माध्यमात शिकत आहेत. आपल्या लोकांचा भाषिक अभिमान किती पोकळ आहे आणि आपण किती मूल्यहीन लोकांच्या जगात साहित्यनिर्मिती करत आहोत ते इथे स्पष्ट व्हावे. तुम्ही जेव्हा आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमात घालता तेव्हाच मराठी ही भाषा शिकण्यात काही अर्थ नाही हे तुम्ही स्वीकारलेले असते. मराठीमुळे ह्या देशात पोट भरता येत नाही हे तुम्ही मान्य केलेले असते. ज्या भाषेमुळे पोट भरता येत नाही,

जी अनावश्यक आहे असे तुम्हाला वाटते ती भाषा तुम्ही इतरांना शिकवताच कशी ? की स्वत:च्या पोटासाठी मराठी आणि पोरांच्या पोटासाठी इंग्रजी असे तुमच्या डोक्यात आहे ? असे असेल तर इतरांच्या मुलांना मराठी कशाला शिकवता ? त्यांनाही इंग्रजी शिकू द्या. निदान स्वत:शी प्रामाणिक राहिल्याचे समाधान तरी तुम्हाला मिळेल. ह्या दुटप्पीपणाला पहिला छेद दिला देशीवाद्यांनी. नेमाडे, काळसेकर ह्यांनी आपली मुले मराठी माध्यमात शिकवली. देशीवादी, आकृतिवादी ह्यांच्यातला हा फरक त्यांच्या अस्सलपणाविषयी बराच बोलका आहे. आपल्या गरीब पत्नीला फक्त गरज वाटेल तेव्हा राबराब राबवायचे आणि शेजेची वेळ आली की श्रीमंत रखेलीचे पाय चाटायचे तशातला हा प्रकार आहे. कृपया मी इथे आंतरराष्ट्रीयवाद सोडतो आहे असे कुणी समजू नका; पण आंतरराष्ट्रीयवाद म्हणजे जगात जिथे आपले स्वार्थ साधले जातील तिथे आपले सगळे स्वाभिमान गुंडाळून जाणे नव्हे, तर खरोखरच जिथे आपल्या कार्याची गरज आहे तिथे राबणे. आज जर अमेरिका गरीब व भारत श्रीमंत अशी स्थिती असती तर मी भारतीयांना अमेरिकेत जा म्हटले असते; कारण कामाची खरी गरज मग तिथे असती. आपला तुकाराम इंग्रजीत जावा असे मला वाटते; कारण खरोखरच इंग्रजीत तुकारामासारखा कवी झालेला नाही; पण केशवसुतांना कोणी इंग्रजीत अनुवादित करायला लागला तर तो मोठा विनोद होईल. हीच गोष्ट आपल्या इतर क्षेत्रांत आहे. आपल्या लोकांना युरोप-अमेरिकेच्या अफाट ज्ञानाच्या पसाऱ्यात काडीचीही किंमत नाही; पण तेच त्यांचे काम ह्या देशात महत्त्वाचे ठरू शकेल. भारतीय समाजशास्त्रज्ञ युरोप व अमेरिकन समाजाच्या समस्या कशा काय सोडवणार आहे? त्या समाजात राहून त्यांचा साधा परिचय करून घ्यायला पाच-दहा वर्षे जातात; मग त्यांचे आकलन वगैरे दूरच. तेव्हा आपल्या पालकांनी एक गोष्ट लक्षात घ्यावी ती म्हणजे आपला पाल्य ह्या देशातच काम करणार आहे. त्यातच त्याची शान आहे. तेव्हा त्याला युरोपियन बनवण्याचा हट्ट सोडा. त्यातून त्याला युरोपियन बनणे शक्य होणार नाहीच, पण तो मराठीही बनणार नाही आणि आंतरराष्ट्रीयत्त्वापासून तर ही मुले शेकडो मैल दूर राहतील; कारण वैश्विक होण्यासाठी स्वसंवेदना कळायला लागते आणि त्या दुभंगलेल्या मनात तयार होत नाहीत. एकीकडे ही वस्तुस्थिती तर दुसरीकडे शासनाचे ढिसाळ भाषिक धोरण व शैक्षणिक क्षेत्रात भ्रष्टाचार, राजकारण्यांचा व अपात्र लोकांचा बजबजाट. ब्रिटिश कालखंडापासून ह्या देशातील सरकारांची डोकी कधीच ठिकाणावर नव्हती. आता ती ह्या देशातल्या म्हाताऱ्या माणसाप्रमाणे गुडघ्यात सरकलेली दिसतात. त्यामुळे लाथांचा सुकाळ सर्वच क्षेत्रात दिसतो. शिक्षण क्षेत्र ह्याला अपवाद नाही. ह्या क्षेत्रात जर शासनाला मराठी जगवता येत नसेल तर शासनाने मराठी मारा असा आदेश द्यावा आणि देशातल्या

शाळाशाळांतून मराठीची कत्तल घडवून आणावी. एकतर शालेय पातळीवर सर्वांना इंग्रजीत शिक्षण द्या किंवा मराठीत शिक्षण द्या. जर येथील जनता इंग्रजाळणारच असेल तर मग गरीब माणूसही इंग्रजाळवा; अन्यथा हे नवे ब्रिटिश इथल्या नेटिवांना नव्या प्रकारची वेठबिगारी करायला लावतील ह्यात शंका नाही. इंग्रजांनी निदान इथली पेशवाई नष्ट करून उपकारच केले; पण हे ब्रिटिश पेशवे आपले पेशवेपणही सोडणार नाहीत आणि व्हाइट पेशवाई ह्या जगाचे फारसे भले करेल असे मला वाटत नाही. आज जगात ती जिथे जिथे अस्तित्वात आली तिथे तिथे तिने तिथल्या लोकांचा सत्यानाशच केला आहे. व्हाइट ब्रिटिश पेशवाई की अशोकाचे आंतरराष्ट्रीय धम्मराज्य असा हा पर्याय आहे. माझा कौल अशोकाच्या बाजूने आहे.

शिक्षणक्षेत्राची एवढी तपशीलवार चर्चा करण्याचे एकमेव कारण म्हणजे आपल्या सर्व समस्या ह्या शैक्षणिक क्षेत्रातील गोंधळातून निर्माण होतात. ह्या देशातल्या राजकारण्यांना आयुष्यात आपण नेमके काय करायला पाहिजे कधीच कळत नाही. आठशे करोड रुपये कमावूनही इथल्या मुख्यमंत्र्यांचा पैशाचा मोह सुटत नाही. नैतिक दिवाळखोरी ही तर आपली खासियत. आपण एकतर संकुचित देशीवादाचा पिंजरा तयार करून उंदीर जमा करत राहतो किंवा जग एकदम मुक्त आहे असे समजून कोटाला गुलाबाचे फूल खोवत एकदम आंतरराष्ट्रीय कबूतरे उडवत राहतो. ह्या दोन्हींतूनही काहीच साध्य झाले नाही, होत नाही आणि होणार नाही. सत्य हे नेहमीच मध्यममार्गातून मिळते. एकीकडे चार इंग्रजी वाक्येही धड न बोलायला शिकवणाऱ्या मराठी शाळा तर दुसरीकडे चुकीचे इंग्रजी बोलायला लावणाऱ्या पोकळ आंतरराष्ट्रीय इंग्रजी शाळा अशा दोन टोकांवर आपण वावरतो आहोत. ह्या दोन्हीही मार्गांनी आपल्या हाती वैचारिक व सृजनात्मक दिवाळखोरीच हाती लागणार आहे. बहुतांशी इंग्रजी माध्यमातून शिकणाऱ्या लोकांनी सेटवर इंग्रजीत बोलत बोलत केलेले हिंदी चित्रपट हे ह्या तथाकथित कॉन्वेन्ट कल्चरची सृजनशीलतेची लायकी दाखवणारी होकायंत्रे आहेत, तर मराठी किंवा प्रादेशिक चित्रपट आपल्या देशी सृजनशीलतेची दिवाळखोरी स्पष्टपणे दाखवतात. ह्या देशातील जनता ज्या पद्धतीने हिंदी चित्रपटांना गर्दी करते आहे त्यावरून तिची मानसिकता, तिची स्वप्ने स्पष्टच दिसतात; पण त्याचबरोबर मदर इंडिया आणि शोले ह्या शतकातील सर्वांत सुपर डुपर हिट गेलेल्या चित्रपटांची कथानके ग्रामीणच असतात. त्यात इथली गावांची संस्कृती असते हेही लक्षात घेण्याजोगे आहे. तेव्हा मागील पानावर जो मध्यममार्ग सांगितला आहे तोच ह्या देशाला तारेल अशी मला खात्री आहे. भारतीय माणूस प्रादेशिक भाषा हिंदी आणि इंग्रजी ह्या तिन्ही भाषांत तयार करून त्याचा संपूर्ण विकास करणे हेच ह्या व्यवस्थेचे ध्येय आहे.

या शैक्षणिक विचाराला पूर्णत्व येण्यासाठी इंग्रजी माध्यमाचा आग्रह धरणाऱ्या काही लोकांचे इथल्या भाषेवरचे आक्षेप पाहू आणि मग आपण नेमाडेंच्या विचाराकडे पुन्हा वळू.

इंग्रजीला नकार देण्यामागे (विशेषत: वैज्ञानिक राष्ट्रभाषा म्हणूनही) एक महत्त्वाचे कारण असते ते म्हणजे इंग्रजी ही परकी भाषा आहे. इथे जाता जाता एक गोष्ट सांगायला हवी. इंग्रजीपूर्वीही हिंदुस्थानात ज्या संपर्कभाषा होत्या त्यापैकी संस्कृत, फारसी ह्या दोन्हीही प्रथम परक्याच भाषा होत्या. ह्यातील संस्कृत, फारसीच्या संभोगातून निर्माण झालेली आणि खडी बोलीच्या गर्भाशयात वाढलेली ऊर्दू ही आजही देशभर टिकून आहे. फारसी नष्ट झाली. संस्कृत मात्र मुरली. इंग्रजीची अवस्था संस्कृतसारखीच आहे. ती फारसीप्रमाणे नाहिशी होणे शक्य नाही. फारसी नाहिशी झाली, कारण ज्ञानाच्या पातळीवर ती कुमकुवत होती. इंग्रजी ज्ञानाच्या पातळीवर संस्कृतपेक्षा श्रेष्ठ आहे. तेव्हा ती ह्या देशात संस्कृतप्रमाणे मुरेल ह्याविषयी माझ्या मनात शंका नाही. मात्र जशी जातिव्यवस्था उभी करून संस्कृतचा अधिकार स्वत:पुरता ठेवला गेला व तिच्या साहाय्याने संपूर्ण ज्ञानाची मक्तेदारी स्वत:पुरतीच ठेवली गेली तशीच स्थिती आज इंग्रजी संदर्भात आहे. इंग्रजी माध्यमाच्या शाळा ह्या महागड्या ठेवून एका विशिष्ट वर्गालाच ते शिक्षण घ्यायला परवडते ठेवायचे आणि ह्या देशातील कायदे, प्रशासन, संसदेत चाललेले राजकारण, उच्च संस्था यांचा कारभार जाणीवपूर्वक इंग्रजीतच ठेवायचा आणि ह्या संस्था ह्या विशिष्ट वर्गाने आपल्या ताब्यात ठेवायच्या हा नवा ब्रिटिश ब्राह्मणवाद. अशी ही नवी व्हाइट पेशवाई गेली काही दशके इथे पद्धतशीरपणे जोपासली जात आहे. ह्या देशात एखादा गरीब शेतकरी व कामगार हा खुनी म्हणून न्यायालयात असतो आणि त्याला फाशी द्यायची की नाही हे ठरवण्याचे काम त्याच्या डोळ्यादेखत दोन व्हाइट कॉलर्ड वकील आणि एक व्हाइट कॉलर्ड न्यायाधीश इंग्रजीतून ठरवत असतात. ज्याच्या जिवाचा हा फैसला असतो त्याला आपल्या जिवाबाबत काय चाललंय हे कळत नाही. हा भीषण विनोद केवळ ह्याच हल्कट देशातील हल्कट न्यायालयात वर्षानुवर्षे चालू राहतो आणि त्या देशातले सुबुद्ध म्हणवणारे लोक ह्या इंग्रजी तमाशाला तितक्याच निर्बुद्धपणे पाठिंबा देत असतात. शेळी जाते जिवानिशी ती अशी आणि ही शेळी वर्षानुवर्षे संसदेतील इंग्रजी भाषणातून घटनेच्या इंग्रजी अभिव्यक्तीतून प्रशासनातल्या इंग्रजी पत्रकातून न्यायालयातल्या इंग्रजी चर्चा व युक्तिवादातून जिवानिशी जात आहे. कुणालाच ह्या शेळीविषयी कसलीही आस्था नाही. ह्या शेळीला आपल्या भोवताली कसे सभ्य कसाई आहेत ते कळत नाही आणि ह्या शेळीच्या अडाणीपणाचे रसभरीत किस्से सांगत आर. के. नारायणसारखे लोक आपली मालगुडी आंतरराष्ट्रीय पातळीवर नेत महान लेखक होत आहेत. जर आपणाला खरोखरच भाषा टिकवायची असेल तर

पहिल्याप्रथम ती भाषा शिकण्याची गरज आपण निर्माण केली पाहिजे. आज ह्या देशात इथल्या भाषा न शिकता वकील, न्यायाधीश, प्रशासकीय अधिकारी, संसदेतला राजकारणी (राज्यसभेतला) होता येते. ह्याउलट वरील प्रतिष्ठेचे व्यवसाय करता येण्यासाठी इंग्रजी मात्र आवश्यक असते. अशा वेळेला पालक पाल्यांना इंग्रजी माध्यमाच्या शाळात घालतील नाहीतर काय इथल्या स्थानिक माध्यमातील शाळात घालतील? हे इंग्रजीतून शिकलेले लोक नंतर ह्या देशातील कारभार इंग्रजीतून हाकतात. ह्यांना ह्या देशातल्या समाजाविषयी काडीचीही आस्था नसते. इथल्या समाजाच्या समस्या ह्यांना कळत नाहीत आणि मग ह्यांनी आखलेल्या विकासाच्या योजना ह्या अनेकदा कागदी ठरतात. कारण कागद इंग्रजीत असले की ते कुणी चाळत नाही. ज्यांच्यासाठी त्या असतात त्यांना तर नाहीच नाही. मग हे लोक त्या योजनांचे पैसे आपल्या खिशात घालत राहतात. ह्या काळ्या पैशातून आपल्या पाल्यांना पुन्हा अधिक महागड्या इंग्रजी शाळेत घालतात, अधिकारी बनवतात. हे पाल्य तेच करतात जे ह्यांच्या बापाने केले. शेळी शेवटी शेळीच राहते व कसाई शेवटी कसाईच राहतो. सत्तेची दारू सोबत असते. शेळीचे उत्तम मांस असते. मांसाहारी ओल्या पार्ट्या होत राहतात.

जर ह्या देशाचा कारभार आपणाला खरोखरच सुधारायचा असेल तर तो कारभार ज्या लोकांसाठी चाललाय त्यांच्याच भाषांत तो चालला पाहिजे. जोपर्यंत हे होत नाही तोपर्यंत तुमचे भाषिक धोरण आणि सक्तीची मराठी म्हणजे शेखचिल्लीचा कल्पनाविलास आहे. ह्यातून काय देशी भाषेचे भले होणार? भाषा शाळेतून सक्तीची केली म्हणजे ती कुणी शिकत नसते, तर भाषेची गरज निर्माण झाली की लोक भाषा शिकतात. तेव्हा प्रथम तुमचा प्रशासकीय कारभार, कायदा व सुव्यवस्था आणि विधानसभा, राज्यसभा व लोकसभा ह्यांच्यातील कारभार लोकांच्या भाषेतून चालवा. मग लोक तुमची भाषा आपोआपच शिकतील. आज ह्याबाबतीत नेमकी उलटी स्थिती आहे. आपला सगळा कारभार, कायदा व सुव्यवस्था, प्रशासन इंग्रजीतून चाललाय आणि त्यामुळे आज ह्या देशात इंग्रजी सक्तीची झालीये. त्यातच ग्लोबल लिंग्वाफ्रॅंका म्हणून इंग्रजीचे आंतरराष्ट्रीय दडपण वाढत चाललंय. आता जर आंतरराष्ट्रीय आणि राष्ट्रीय पातळीवर इंग्रजी आपण आवश्यक ठरवणार असू तर मग लोक आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमात घालतील नाहीतर काय करतील ? मला वाटते भाषेबाबत कयामतीची वेळ आता आलीये आणि तुम्हाला आता हा कयामतीचा फैसला करावाच लागणार. जर तुमचा कौल इंग्रजीच्याच बाजूने असेल (आज तुम्ही तो तसा दिला आहे) तर मग मराठी माध्यमाच्या शाळा कशासाठी ? कविता वाचण्यासाठी ? कादंबऱ्या वाचण्यासाठी ? माझ्या मते मग मराठीची काहीही गरज नाही. आधुनिक मराठी साहित्य

इतके भुक्कड आहे की लोकांनी इंग्रजी साहित्य वाचलेले बरे ! की तुमचा ह्यामागे वेगळा डाव आहे. इंग्रजीतून प्रशासक, व्यवस्थापक निर्माण करायचे आणि त्यांना लागणारे गुलाम कामगार मराठी माध्यमातून निर्माण करायचे असा तुमचा प्लॅन आहे? मला तरी तुमचा प्लॅन असाच काहीतरी दिसतो आहे. तेव्हा आता कयामतीचा फैसला करा. तो इंग्रजीच्या बाजूने केलात तरी चालेल. निदान ह्या कुतरओढीतून सुटका होईल. आमच्या मुलांना कुठल्या माध्यमात शिकवायचे त्याचा तरी निर्णय घेता येईल. तेव्हा देशी भाषेची कयामत जवळ आलीये. इस पार या उसपार फैसला लोकांच्या हातात आहे. माझ्या मते ह्या देशात ज्या भाषेत बहुसंख्य बोलतात त्याच भाषेच्या बाजूने फैसला झाला पाहिजे. असो.

इंग्रजी भाषेच्या संदर्भात आलेले आणखी काही युक्तिवाद आपण पाहू. आज मराठीतील जवळजवळ सर्वच कवी (विशेषत: मध्यमवयीन) आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमात शिकवत आहेत. त्यांना असे का विचारले तर त्यांच्याकडे व्यवहार आणि पोट असेच उत्तर असते. आता पोट हे भाषेपेक्षा महत्त्वाचे असते हे कुणीही मान्य करेल; पण त्याचबरोबर भाषा ही प्रथम पोटासाठीच असते हेही इथे सांगितले पाहिजे. जर मराठी भाषेने ह्यापुढे पोट भरणार नसेल तर मग मराठी भाषा टिकवाच कशाला ? ती मरू दे म्हणून मी ह्यांना म्हणालो की मग तुम्ही मराठीत कविता लिहून मराठी कशाला टिकवता? तुम्ही इंग्रजीत कविता लिहून तुमचे पोट आंतरराष्ट्रीय का करत नाही? त्यामुळे ते मोठे होणार नाही का? नाहीतरी मराठी कवी आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमात शिकवण्याच्या बाबतीत जो उत्साह दाखवत आहेत तो बघता मराठीची मृत्युघन्टा वाजते आहे ह्यात शंकाच नाही. मराठी ही एक मृतप्राय होऊ घातलेली भाषा आहे. तुम्ही एका मरत चाललेल्या भाषेत तुमची कविता का लिहीत आहात ? तर ह्यावर त्यांचे उत्तर असे की, आम्ही आत्मानंदासाठी मराठीत कविता लिहितो. माझे म्हणणे असे की, मग तुम्ही ती तुमच्या बासनात गुंडाळून तुमचा आत्मानंद तुमच्यापुरताच का ठेवत नाही? तरीही मीही आनंदवादी असल्याने तुमचा हा युक्तिवाद मान्य करतो; पण प्रश्न असा की, तुम्हाला जर मराठी ही मरणपंथाला लागलीये असे वाटते तर तुम्ही प्रत्यक्ष तसे जाहीर का करत नाही ? मराठी टिकवा असे सांगत व्यासपीठावरून कशाला बोंबलत फिरता ? मराठी नष्ट करा म्हणून का सांगत नाही ? का मराठी फक्त तुमच्या कविता वाचण्यापुरती टिकावी असे तुम्हाला वाटते ? मराठी इज आऊट ऑफ डेट असे निर्भयपणे सांगणारा एकही महावीर मला माझ्या आयुष्यात भेटलेला नाही. जर मराठी टिकणार असे वाटत असेल तर मग तिचा माध्यम म्हणून स्वीकार का करू नये ? घरात मराठी, तर शाळेत इंग्रजी ह्याला फारसा अर्थ नाही.

मराठीच्या विरोधात होणारा आणखी एक युक्तिवाद म्हणजे मराठीत साधी, दहावीपर्यंतची पाठ्यपुस्तकेही नीट नाहीत. साधे बेसिक नॉलेजही मराठीत निर्माण झालेले नाही. माझे म्हणणे, वस्तुस्थिती जर अशी असेल तर मग अशी टेक्स्टबुके निर्माण करण्याची ज़बाबदारी कोणाची ? ज्यांना ही वस्तुस्थिती कळते त्यांची, की ज्यांना ती कळत नाही त्यांची ? ज्यांना ही वस्तुस्थिती कळते ते लोक मराठीत अशी टेक्स्टबुके निर्माण करण्याऐवजी इंग्रजी आणू इच्छितात. असे करणे म्हणजे आपल्या बायकोला मूल होत नसल्यास तिला मूल का होत नाही ते न बघताच तिला टाकून दुसरी बायको आणा म्हणण्यासारखे आहे. एक गोष्ट इथे सांगितली पाहिजे, ती म्हणजे शासनाने आपली पाठ्यपुस्तके तयार करण्याचा हट्ट सोडून द्यावा. शासनातील राजकारण इतक्या घाणेरड्या पातळीवरचे आहे की आपल्या पाठ्यपुस्तक मंडळात अनेकदा फालतू लोकांची वर्णी लागलेली दिसते. तेव्हा ह्याबाबत शासनाने आपला अट्टाहास सोडावा; कारण एकतर ह्यामुळे एकाच पाठ्यपुस्तकाचा पर्याय असतो. निवडीला वाव नसतो आणि शासकीय कारभारामुळे अत्यंत फालतू टेक्स्टबुके तयार होतात. आणि पाठ्यपुस्तकाच्या सक्तीमुळे हे पाठ्यपुस्तक झक मारत सर्वांना वापरावे लागते. तेव्हा सरकारने अभ्यासक्रमाचा आराखडा द्यावा आणि पाठ्यपुस्तकाचे काम खाजगी लेखक व प्रकाशकांकडे सोपवावे. इथे स्पर्धा निर्माण झाली की आपोआप चांगली पाठ्यपुस्तके निर्माण होतील आणि शिक्षकांना, शाळांना त्यातून निवड करता येईल. फक्त दहावीला भाषांचे धडे तेवढे सरकारने सुचवावेत. एरव्ही सर्वांना मुक्त धोरणात सोडावे. दहावीची परीक्षा तेवढी बोर्डाने घ्यावी..

मराठीबाबत नेहमी होणारा युक्तिवाद म्हणजे आंतरराष्ट्रीय व्यापार व विज्ञानात इंग्रजी लागते, तेव्हा मराठी फेकलेली बरीच. एक गोष्ट मागेच सांगितली की आपण आंतरराष्ट्रीयतेत जगतो आहोत हे सत्य आहे; पण ही आंतरराष्ट्रीयता आपल्यासाठी अस्तित्वात आहे, आपण आंतरराष्ट्रीयत्वासाठी नाही. ही आंतरराष्ट्रीयता मराठीतून व्यक्तच होणार नाही असे मानणे मूर्खपणाचे आहे. ह्याबाबतीत मराठीला इंग्रजीची उसनवारी करावी लागणे अटळ आहे. किंबहुना पर्यायी मराठी शब्द शोधण्यापेक्षा सर्रास इंग्रजी शब्द वापरावेत ह्या मताचा मी आहे. मी सुचवलेल्या भाषिक धोरणात इंग्रजी, हिन्दी, मराठी ह्या तिन्ही भाषांत विद्यार्थी तयार होईल ह्या दृष्टीनेच विचार केला आहे. तेव्हा आंतरराष्ट्रीयत्वासाठी आवश्यक असणारे इंग्रजी आपण मराठी शाळातून शिकवू शकतो. त्यासाठी संपूर्ण राष्ट्राची मातृभाषाच इंग्रजी करण्याचा अट्टाहास धरणे योग्य नव्हे. इंग्रजी माध्यमात हा अट्टाहास आहे आणि त्यातून सृजनशीलतेचा ऱ्हासच दिसणार आहे. ज्या भाषिक समूहांना संपन्न भाषिक परंपरा नाही त्यांनी इंग्रजी भाषा स्वीकारली किंवा स्पॅनिश फ्रेंच स्वीकारली

तर ते समजून घेता येईल. कारण त्याशिवाय पर्याय नाही. आज अनेक आफ्रिकन लॅटिन अमेरिकन राष्ट्रांची भाषा एकतर नष्ट झाली आहे किंवा ती अत्यंत मर्यादित आहे. त्यामुळे त्यांनी इंग्रजी, फ्रेंच किंवा स्पॅनिश यांपैकी राष्ट्रभाषा स्वीकारल्या ते बरेच केले. कारण त्यामुळे त्यांचा विकासच होईल. पण ज्या भाषिक समूहाने जगातले पहिले वाङ्मय निर्माण केले, ज्यांनी रामायण, महाभारतासारखी महाकाव्ये दिली, ज्याने बुद्ध, महावीर, गुरू नानक, शंकराचार्य वगैरेंचे एक नव्हे दोन नव्हे चार चार धर्म जन्माला घातले, ज्यांनी जगासाठी चौदा चौदा दर्शने जन्माला घातली, ज्यांनी काही मूलभूत शोध जगाला दिले त्या भाषिक समूहाला तुमची मातृभाषा तुम्ही विसरा आणि इंग्रजी हीच मातृभाषा माना असे सांगणे हा वसाहतवादी गुलामगिरीतून आलेल्या षंढत्वाचा कळस होय. आपले भाषिक प्रश्न सोडवता येत नाहीत म्हणून संपूर्ण भाषाच आयात करा म्हणून सांगणाऱ्या ह्या नतद्रष्टांना जरा दोन कानाखाली काढून ठिकाणावर आणावे लागेल. जपान आणि चीन ह्या आपल्यासारख्याच भाषिक पातळीवर संपन्न असलेल्या भाषिक समूहांनी आपली भाषा उभी केली ती तिथे असे निर्लज्ज जन्माला आले नाहीत म्हणूनच. तिथल्या अस्सल लोकांनी अपार मेहनत घेऊन आपली भाषा उभी केली. त्या उलट इंग्रजी भाषा मातृभाषा करणाऱ्यांनी ह्यापासून नेहमी पळ काढला. ह्या लोकांना जपान व चीन आज इंग्रजी भाषा शिकताहेत म्हणजे नेमके काय करत आहेत ते सांगितले पाहिजे. ह्या प्रश्नासाठी जरा मागे जाऊ. आपली भाषा उभी करण्याची जबाबदारी इथल्या ब्राह्मण वर्गाचीच होती; कारण तेच इथले सुशिक्षित लोक होते. साक्षर होते. त्यांनीच अशी पाठ्यपुस्तके निर्माण करायला हवी होती; पण ह्या वर्गाने त्याऐवजी आपली मुले इंग्रजी शाळेत जाऊन अमेरिकेत कशी सेटल होतील हे पाहिले. म्हणजे आयुष्यभर प्रश्नापासून पळत राहिले आणि हे प्रश्न दाराशी येताच हे अमेरिकेला गांडीला पाय लावून पळू लागले. हे प्रश्न आपल्याच पूर्वजांनी ज्ञानांची मक्तेदारी आपल्याकडे ठेवून इथल्या पंचाण्णव टक्के जनतेला अडाणी, निरक्षर ठेवल्यामुळेच निर्माण झालेत हेही ह्यांनी लक्षात घेतले नाही आणि घेत नाहीयेत. ह्या वर्गाने जर पूर्वीच सर्व समाज साक्षर व्हायला मोकळा ठेवला असता तर हे भाषिक प्रश्न कशाला निर्माण झाले असते? संस्कृत ही भारताची निर्विवादपणे राष्ट्रभाषा झाली असती आणि एक बलवान राष्ट्र म्हणून एकीकरण करून आपण इंग्रजांना १९२० पर्यंतच हाकलून देऊन एव्हाना जपान आणि चीनच्या खांद्याला खांदा लावून उभे राहिलो असतो. कारण संस्कृतमध्ये ही ताकद होती, पण ती संधी तो क्षण ब्राह्मणवर्गाच्या नतद्रष्टपणामुळे आपण गमावला. आज जपान किंवा फ्रान्स इंग्रजी भाषा शिकताहेत ते ग्लोबल लिंग्वाफ्रँका म्हणून. त्यांनी तिचा मातृभाषा म्हणून स्वीकार केलेला नाही किंवा आपले शालेय शिक्षण ते इंग्रजीतून देतही नाहीत. भारतातही इंग्रजी

हवी ती ग्लोबल लिंग्वाफ्रँका म्हणून; मातृभाषा म्हणून नव्हे आणि म्हणूनच शालेय शिक्षण इंग्रजीतून नको तर मातृभाषेतून हवे. आज जपान किंवा फ्रान्स इंग्रजी शिकतात. कारण आंतरराष्ट्रीय मार्केटमध्ये विकण्यासारखे त्यांच्याजवळ काहीतरी आहे. आपले लोक एवढे अडाणी की आंतरराष्ट्रीय मार्केटमध्ये विकायला लागणाऱ्या वस्तू तयार करण्याआधीच आम्ही ग्लोबल लिंग्वाफ्रँकामधली ऐंशी कोटी माणसे (खरे तर पोपटच) तयार करायला लागलोय. बहुधा आंतरराष्ट्रीय मार्केटमध्ये इंग्रजी बोलणे हे क्वालिफिकेशन असते अशी आमच्या तथाकथित बुद्धिमान लोकांची समजूत झालेली दिसते. त्यांना हे सांगितले पाहिजे की बाबांनो, आंतरराष्ट्रीय मार्केटमध्ये कुणी तुमचे इंग्रजी बघत नाही, तर तुमच्या प्रॉडक्टस्‌चा दर्जा बघते. ही प्रॉडक्टस् गुणवत्तापूर्ण होण्यासाठी तुमच्याजवळ तीन गोष्टी लागतात. (१) प्रतिभा, (२) ज्ञान आणि (३) अपार कष्टाचे शिस्तबद्ध काम. ह्यातील प्रतिभा, विचार करण्याची ताकद ही मातृभाषेतून शिकल्यास अधिक वाढते ही एक निर्विवादपणे सिद्ध झालेली गोष्ट आहे; म्हणून शालेय शिक्षण मातृभाषेतून असायला हवे. शाळेत शिकण्यापूर्वीच आपण विचार करायची सर्व तंत्रे आपल्या मातृभाषेतून आत्मसात केलेली असतात; तेव्हा शाळेत इंग्रजी शिकावी लागल्यास विद्यार्थ्यांना प्रथम इंग्रजीतून विचार करायला शिकावे लागते आणि त्यात उमेदीची वर्षे वाया जातात. काही हुशार विद्यार्थी इंग्रज़ीतून विचार करणेही लवकर आत्मसात करतात; पण शाळा ह्या पाच-दहा टक्के लोकांसाठी नसते, तर सर्वच विद्यार्थ्यांसाठी असते, हे आपण लक्षात घेतले पाहिजे. इंग्रजीं माध्यमाचा विचार करताना अनेकदा ह्या दहा टक्क्यांचाच विचार प्रामुख्याने केला जातो तो योग्य नव्हे. इंग्रजी माध्यम झेपत नाही म्हणून माझ्यापुढे रडणारे, पण पालकांना कसे सांगायचे म्हणून चिंतेत पडलेले विद्यार्थी मी पाहिलेले आहेत. तेव्हा शालेय शिक्षणात आपण मराठीत विचार करायला शिकवूया आणि इंग्रजी, हिन्दी, मराठी ह्या तीन भाषांत ज्ञान गोळा करण्याचे बळ मुलांच्या पंखात निर्माण करूया; अणि मग ते ह्या तीनच का जगातल्या हव्या तेवढ्या भाषेतून उडू देत. पण ह्यासाठी प्रथम पंख बळकटच असले पाहिजे. इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्या लोकांच्याबाबत माझा अनुभव असा की, अनेकदा हे लोक इतरांचे विचार केवळ रिफ्लेक्ट करत असतात. अनेकदा वस्तुस्थितीतून निष्कर्ष काढण्याऐवजी आयत्या निष्कर्षातून वस्तुस्थितीतील पोषक असे तपशील गोळा करतात. त्यात विज्ञानातील आईन्स्टाईन, हायझेनबर्गची उसनवारी सहज खपते; कारण हे वैज्ञानिक विचार निर्जीव वस्तुस्थितीशी निगडित असतात, पण मानव्य विज्ञानात जेव्हा देरीदा, मार्क्स ह्यांची उसनवारी करून हे लोक मॉडेल उभे करू बघतात तेव्हा तोंडघशी आपटतात. कारण देरीदा काय, मार्क्स काय ह्यांनी तिथल्या वस्तुस्थितीतून आपले मॉडेल उभे केलेले असते. आमचे मानव्यवैज्ञानिक

आधी मॉडेल तयार करतात आणि नंतर वस्तुस्थिती पाहतांत. ह्यातून ह्यांच्या मनात ना शेंडा ना बुडखा अशी एक काल्पनिक वस्तुस्थिती तयार होते आणि मग आमचे मायबाप सरकार ह्यांच्या काल्पनिक वस्तुस्थितीतून एक प्रॅक्टिकल स्कीम (ह्याला आमचे मायबाप सरकार कलमी कार्यक्रम म्हणते ते किती योग्य असते) तयार करते. ह्या स्कीम राबवणारे अधिकारीही असेच कुठल्यातरी इंग्रजी स्कूलमधून तयार झालेले असतात त्यांचाही कधी फारसा वस्तुस्थितीशी संबंध आलेला नसतो. परिणामी ह्या देशात कागदावर विहिरी खणल्या जातात. कागदातून दुष्काळाचे निवारण होते. कागदावरच घरे बांधली जातात; कारण कुणालाच इथल्या इंग्रजी न येणाऱ्या अडाणी जनतेविषयी सोयरसुतक नसते. आपुलकी नसते. ह्यांची पंचतारांकित हॉटेलात सेमिनार्स भरत राहतात. आमची अडाणी जनता खंडोबाला नवस बोलत राहते. नैतिकतेशी दोघांचाही संबंध नसतो. बेशिस्तपणा आणि आळशीपणा दोघांच्याही नसानसांत भिनलेला असतो. बुद्धिमान लोकांना आपल्या देशातील वस्तुस्थितीवरून आपली मॉडेल्स, आपली भाषा उभी करण्याचा कंटाळा असतो. ह्यांना युरोपच्या उसनवारीतून तथाकथित चर्चा करायला आवडतात. बौद्धिक आळस नसानसांत भिनलेला असतो तर शेतकऱ्यांची, कामगारांची काम करायची तयारी नसते. आठ तासाचे काम करून उरलेला वेळ बिड्या फुंकण्यात आणि गप्पा छाटण्यात घालवायचा असतो. बुद्धिमान लोक सरकारी पैशाने किंवा लाचेच्या पैशाने जॉनी वॉकर किंवा चिवास रिगल ढोसतात. तर अडाणी माणूस दहा रुपयातील पाच रुपयात नवटाक ढोसून टाइट असतो. दोघांनाही दारू पिल्यानंतर एकच स्वर्ग मिळतो आणि दोघेही त्या स्वर्गात सुखेनैव नांदतात. ही वस्तुस्थिती जर बदलायची असेल तर मुळात शिक्षणापासून सुरूवात करावी लागेल. आपला माणूस प्रथम विचार करायला शिकला पाहिजे. त्यासाठी त्याचे शिक्षण मातृभाषेतूनच झाले पाहिजे. जर आपणाला आंतरराष्ट्रीय मार्केटमध्ये उभे राहायचे असेल तर प्रथम आपल्या प्रॉडक्टसची गुणवत्ता जबरदस्त हवी आणि आपले प्रॉडक्टस् आंतरराष्ट्रीय मार्केटमध्ये वेगळेपणामुळे उठून दिसले पाहिजेत. ह्याचबरोबर नवीन नवीन सुधारणा आणि नवीन प्रॉडक्टस् आपणाला मार्केटमध्ये आणता आले पाहिजेत ह्यासाठी प्रतिभा, ज्ञान आणि शिस्तशीर कष्ट हवेत. कुठल्याही प्रॉडक्टस्मध्ये सर्वसाधारणत: नव्वद टक्के कामगार, त्या कामगाराच्या कामाचे नियंत्रण करणारा व्यवस्थापकवर्ग, प्रॉडक्टस् डिझाईन करणारा वर्ग आणि उच्च मॅनेजमेंट व मालकांचा वर्ग असे चार वर्ग असतात. ह्यातील कामगारवर्ग व व्यवस्थापकवर्ग हा ९५% असतो आणि त्याच्या क्षमतेवर धंदे उभे असतात. हे लोक मातृभाषेतूनच व्यवहार करत असतात. ह्यांचा आंतरराष्ट्रीय मार्केटशी काहीही संबंध येत नसतो. अशा ९५% वर्गाला आंतरराष्ट्रीय मार्केटसाठी तुम्ही इंग्रजी भाषा तुमची मातृभाषा म्हणून

आत्मसात करा असे सांगण्यात काय अर्थ आहे? उरलेले पाच टक्के हे मुळातच एवढे हुशार असतात की इंग्रजी भाषा ते कुठल्याही माध्यमात शिकले तरी आत्मसात करतातच. तेव्हा ह्या पाच टक्क्यांसाठी पंच्च्याण्णव टक्क्यांचा बळी देणे योग्य नव्हे.

मातृभाषेसंदर्भात एक युक्तिवाद म्हणजे प्रमाण मातृभाषा अनेकदा आदिवासींची मातृभाषा नष्ट करते, तशीच जर इंग्रजी ह्या विश्वप्रमाण भाषेने तुमच्या भाषा नष्ट केल्या तर बिघडले कुठे ? फक्त हिंदुस्थानातच हा निर्लज्ज प्रश्न विचारला जाऊ शकतो. फ्रेंच, जर्मनवाल्यांना हाच प्रश्न विचारा, ते निश्चितच विचारणाऱ्याला वेड्याच्या इस्पितळात टाकतील. एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी. इथली प्रमाण मातृभाषा आणि पोटभाषा ह्यांचे नाते इंग्रजी आणि इथल्या प्रमाणभाषा ह्यांच्यापेक्षा वेगळे आहे. मुळातच प्रमाण मातृभाषा व पोटभाषा यांचा सांस्कृतिक संबंध जैविक असतो. दोघांमागे तमाम ऐतिहासिक परंपरा असते. मुख्य म्हणजे दोन्हींच्या भाषिक संरचना ह्या समान सूत्रावर आधारलेल्या असतात. त्यामुळेच प्रमाण मातृभाषा ही चटकन् आत्मसात केली जाऊ शकते. त्यामुळेच पोटभाषा हळूहळू प्रमाण मातृभाषेच्या पोटात सामावली जाते. ह्याच पार्श्वभूमीवर आणखी एक प्रश्न निर्माण होतो. मराठी, पंजाबी, गुजराती, राजस्थानी वगैरे भाषा हिन्दीच्या पोटात सामावल्या जाणार आहेत का? निर्भावात्मक पातळीवर हिन्दीचे कॉन्ट्रिब्यूशन झिरो असले तरी सभावात्मक पातळीवर चित्रपट व टीव्हीमधून हिन्दीचे आक्रमण वाढते आहे. मराठी माणूस हिंदी चित्रपट व टीव्ही सिरीयल पसंत करतो आहे. गुजराती, राजस्थानी वगैरेबाबतही हीच वस्तुस्थिती आहे. मुंबई कधीच हिंदी झालेली आहे. दिल्लीही झाली आहे. आजच्या युगात कलात्मक अभिव्यक्तीचे, सभावात्मक आविष्काराचे माध्यम म्हणून चित्रपट व टीव्ही ह्याच प्रमुख कला आहेत आणि ह्या कला आज पूर्णपणे हिन्दीने आपल्या ताब्यात घेतल्या आहेत. ह्यांचाच अर्थ महाराष्ट्राचे वैज्ञानिक विश्व इंग्रजीतून तर कलात्मक भावविश्व हिन्दीतून व्यक्त होते आहे, असे मराठी माणसाला वाटते आहे. ह्याशिवाय हिन्दीला एवढी गर्दी झाली नसती; जर हिन्दी ही आपल्या कलांची भाषा राहणार असेल तर आपण त्याला विरोध करावा का ? माझ्या मते आज हिन्दी प्रत्यक्ष मराठी भाषिकांच्या व्यवहारात अस्तित्वात नाही, पण जनतेने जर तिच्या बाजूने कौल दिला असेल तर आपण तो स्वीकारायला हवा. भविष्यात महाराष्ट्रीयन हिन्दी नावाचा प्रकार अस्तित्वात आला तर मला फारसे आश्चर्य वाटणार नाही कारण लिपी, संरचना, सांस्कृतिक परंपरा ह्या सर्वच बाबतीत दोन भाषांत प्रचंड साम्य आहे. त्यामुळे भविष्यात कदाचित मराठी हिन्दीत आणि हिन्दी मराठीत विलीन होऊन महाराष्ट्रीयन हिन्दी अस्तित्वात येईल. बंम्बैया हिन्दी ही केवळ ह्या हिन्दीची सुरुवात आहे. ह्या येऊ घातलेल्या भाषेला मी विनोदाने हिन्दीठी किंवा

मन्दी म्हणत असतो; कारण हिन्दी पट्टा सुधारणेच्या बाबतीत इतका मन्द आहे की सध्याही ह्या पट्ट्याला आपले आक्रमण सर्वंकष करता येणे शक्य नाही. हिन्दीचे सध्याचे क्वालिफिकेशन ती बहुसंख्यांना कळते हेच आहे. ज्या दिवशी हिन्दी अनुवादाने आणि स्वतंत्र प्रज्ञेच्या विचारवंतांनी संपन्न होईल ज्या दिवशी हिन्दी पट्टा आर्थिकदृष्ट्या संपन्न होईल. त्या दिवशी हिन्दी संपूर्ण उत्तर भारताची (महाराष्ट्रापर्यंतच्या) भाषा बनलेली दिसेल. ह्यामुळे इतर भाषिकांचे फारसे नुकसान होणार नाही; कारण इथल्या संस्कृतीला कसलाही धक्का न लागता हे घडून येईल. कारण इतिहासापासून धर्मशास्त्रापर्यंत एक समान संरचना असल्याने इथे आक्रमणाचा प्रश्न उद्भवत नाही. फक्त ह्या हिन्दी भाषिकांचे नेतृत्व मात्र मराठी, पंजाबी ह्यांना करावे लागेल, तर आर्थिक नाड्या गुजराथी, मारवाडी आणि सिंधी आपल्या ताब्यात ठेवतील अशी चिन्हे दिसत आहेत. मराठ्यांना उत्तरेत पुन्हा एकदा वर्चस्व प्रस्थापित करता येणे अशक्य नाही. हे होईल तेव्हा होवो, सध्या मात्र महाराष्ट्राने आपली मराठी नीट जोपासावी हे उत्तम.

शिक्षण क्षेत्रावरील ह्या प्रदीर्घ विवेचनानंतर आपण आता मूळच्या प्रश्नाकडे वळू. त्या पूर्वी वरील विवेचनावरून खालील गोष्टी स्पष्ट होतील.

(१) इंग्रजी हीच ग्लोबल लिंग्वाफ्रँका असून भारतात ती विज्ञानाची राष्ट्रभाषा आहे आणि तिला पर्याय नाही. महाविद्यालयीन पातळीवर तिचा माध्यम म्हणून स्वीकार करायला हवा.

(२) मानव्यविज्ञानात इंग्रजी हीच राष्ट्रभाषा आज दिसत असली तरी भारतीय मानव्यवैज्ञानिकांना भारतीय उपखंडात राहणाऱ्या मानवाचे प्रश्नच सोडवायचे असल्याने मानव्यविज्ञानाने राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा स्वीकार करणे आवश्यक आहे. मराठी मानव्यवैज्ञानिकाला महाराष्ट्राचे प्रश्न सोडवायचे असल्याने त्याने मराठीतून विचार करणे आवश्यक आहे. त्यामुळे इथल्या मानव्यविज्ञानाचे माध्यम मराठीच हवे. मातृभाषाच हवे.

(३) कला ही मुळातच सृजनात्मक विकासावरच भर देत असल्याने आणि सृजनात्मक विकास हा मातृभाषेतून चांगला होत असल्याने कलाक्षेत्रात माध्यम मातृभाषाच हवे.

विज्ञान, मानव्यविज्ञान आणि कला ह्या तिन्ही गोष्टी आंतरराष्ट्रीय संदर्भातच वाढत असल्याने त्यांना देशीयतेची कुंपणे घालू नयेत. म्हणूनच तिन्ही शाखांत इंग्रजी ही एक प्रमुख भाषा राहायला हवी.

नेमाडेंचा भाषाविषयक विचार हा साहित्याच्या संदर्भात असल्याने तो साहित्यकेंद्री झाला आहे, ही त्याची ठळक मर्यादा आहे. नेमाडेंच्या 'टीकास्वंयवर' मधील रचनेवर दोन विचारांचा

प्रभाव असल्याचे मी मागे म्हटले होते.

(१) देशीयता ही फक्त देशी भाषेतच चांगली व्यक्त होते.

(२) इंग्रजी ही परकी भाषा आहे व तिचे भाषिक वर्चस्व आपण सहन करू नये.

वरील दृष्टिकोनाचा थोडा विचार आपण मागे केला आहे. साहित्यातील अवकाशाची तपशीलता मातृभाषेतच चांगली व्यक्त होते हे खरे आहे. पण विज्ञानात अशा तपशीलांची भानगड अस्तित्वात नसल्याने विज्ञानाचे ज्ञान व्यक्त करायला देशी भाषेची आवश्यकता नाही हे आपण पाहिले. म्हणूनच नेमाडेंचा विचार हा साहित्यापुरता ठीक आहे. ह्यामुळेच विज्ञानात इंग्रजी भाषा अटळ ठरते. त्याची कारणेही आपण मागे पाहिली. इंग्रजी ही परकी भाषा असली तर तिच्यातून केवळ पाश्चिमात्य मूल्ये येतात हे फारसे खरे नाही. चिनी आणि जपानी मूल्येही इंग्रजी ही ग्लोबल लिंग्वाफ्रँका असल्याने इंग्रजीतूनच येतात. ही मूल्ये वैश्य मूल्ये असतील, दलित मूल्ये असतील, तर त्यांचा स्वीकार करायला काहीच हरकत नाही. आपल्या भोवतालचे अवकाश देशी न राहिल्याने आधुनिक साहित्य कुठल्याही भाषेत लिहिले गेले तरी ते प्रथम वैश्य मूल्ये आविष्कृत करते हेही आपण मागे पाहिले. आपली तथाकथित देशी मूल्यांची व्यवस्था ही मोठ्या प्रमाणावर भोंगळ असल्याने ती फेकूनच द्यायला हवी. त्या उलट त्या व्यवस्थेत जे चांगले आहे ते केवळ आपल्या देशाचे नसून सर्व जगाचे झाले पाहिजे. किंबहुना झाले आहे हेही आपण पाहिले. थोडक्यात, नेमाडे ज्याला देशीयता म्हणतात ती कुठल्याही अर्थाने देशीयता राहिलेली नाही आणि जातीसारख्या स्वरूपात तिचे जे अस्तित्व जाणवते ते आपण ब्राह्मण, क्षत्रिय जाणिवेत घुटमळत असल्याने जाणवते. प्रत्यक्षात ही देशीयता परंपरेचे अनावश्यक असलेले ओझेच असल्याचे दिसते. ह्या ओझ्यामुळेच आपला प्रवास मंद चाललाय. मातृभाषेत देशीयता चांगली व्यक्त होते असे नेमाडे म्हणतात. मला वाटते इथेही हा देशीयतेच्या संस्कारणाचा भाग दुय्यम असून मानसशास्त्रीय संस्कारणाचा भाग महत्त्वाचा आहे. लहानपणापासून आपण आपल्या भाषेतूनच विचार करतो. म्हणून अवकाशाचे तपशील मग ते देशी असोत की नसोत, आपण आपल्या भाषेतूनच चांगले व्यक्त करतो. थोडक्यात, इथेही अवकाश वा भाषेपेक्षा संस्कारणाचा - कंडीशनिंगचा भाग आधिक आहे.

नेमाडेंनी ह्या संदर्भात अरुण कोलटकरांवर जी टीका केलीये ती आपण पाहू. ह्यातील भाषेच्या वापरासंदर्भातील टीका योग्यच आहे. कुठलाही कवी आपल्या मातृभाषेतून जितक्या समर्थपणे व्यक्त होतो तितका परक्या भाषेत व्यक्त होत नाही ही एक वस्तुस्थिती आहे. क्वचित

प्रसंगी इंग्रजी, फ्रेंच, हिन्दी, मराठी अशा एकमेकात नांदणाऱ्या भाषा असतील तर दोन्ही भाषांवर प्रभुत्व शक्य असते. एरव्ही हे शक्यच नसते हे नेमाडेंचे म्हणणे कोणीही मान्य करेल. त्यामुळेच इराणी कविता व तिचा इंग्रजी तर्जुमा यांच्या तुलनात्मक अध्ययनातून नेमाडेंनी काढलेले निष्कर्ष कोणीही मान्य करेल; मात्र ह्याला कारण इंग्रजी ही भाषिक संरचनेबाबत फारच वेगळी आहे हेही आहे. इंग्रजी, फ्रेंच किंवा मराठी, हिन्दी असे जर तर्जुमे असतील तर ते तंतोतंत लागूच होतील असे नाही. मी सुरुवातीच्या कालखंडात गझल लिहायचो त्यावेळची गझल व तिचा हिन्दी तर्जुमा जर पाहिला तर हे लक्षात येईल. मूळ मराठी गझल प्रथम पाहू.

*हुंदका हा माझा हाय तिच्यापर्यंत जात नाही*
*कविता तिची आहे तिथे गझल माझी गात नाही*
*रुग्ण आहेत सर्व स्वप्ने खोलीच्या आत माझी*
*वैद्य पण पूर्वीसारखा त्यांच्याकडे पहात नाही*
*काय आहे उपयोग ह्या सुंदर पहाटेचा मला*
*अंगणी कुणी पहिल्यासारखे गुणगुणत नहात नाही*
*विझला आहे सूर्य आणि विझले आहेत सितारे*
*डोकावतो दारात पण चंद्र येत घरात नाही*
*स्मृती तिची आसवांनाच घेऊन येते परंतु*
*तिला पाहून हसण्याची सवय काही जात नाही*
*उघड्या करू नको तुझ्या वेदना तू श्री मैफिलीत*
*टाळ्यांसाठी हात पण हातात तुझ्या हात नाही*

**ह्या गझलेचा हिन्दी तर्जुमा**

*आह भरना मेरा अब उसतक जाता नहीं*
*वो गझलमे रहता है और मै गाता नही*
*बीमार होकरभी मेरे रोते नही अब ख्वाब*
*हाल मेरा पूछनेको कोई अब आता नहीं*
*क्या करू लेकर मै खूबसूरती सुबहकी*
*आँगनमें गुनगुनाकर कोई अब नहाता नहीं*
*सूरज कब का डुब गया शम्अ जलकर बुझ गयी*

*चाँद गौरसे देखता है मगर मुझे बुलाता नही*
*आँसू लेकर आती है उसकी हर याद मगर*
*देखकर उसे मुस्कुराना आदत है जाता नही*
*हुस्नवालोंकी है बस्ती गमकी दास्ता न सुना*
*तालीकेलिये सौ हाथ हाथमे कोई आता नहीं*

इथे मूळ मराठीपेक्षा हिंदी तर्जुमा आधिक चांगला उतरलाय हे सहज लक्षात येईल. सर्वच भाषांतरात भाषांतरित कविता ही कमी सरसच असेल असे नाही. खुद्द नेमाडेंनी टीकास्वंयवर पान १०४ वर नव्या किरकोळ कवींच्या कविता मराठीपेक्षा इंग्रजीतच चांगल्या उतरलेत असे म्हटले आहे. मात्र नेमाडेंचा जो मुद्दा मला महत्त्वाचा वाटतो तो म्हणजे इंग्रजीतून लिहिणाऱ्यांना त्यांच्या काळाची समकालीन इंग्रजी जी न्हाव्याच्या दुकानापासून यंत्र कामगारापर्यंत बोलली जात असते ती माहीत नसते. हे लोक डेड पाठ्यपुस्तकातले इंग्रजी लिहीत असतात हे अक्षरशः खरे आहे. ह्यावर उपाय म्हणून मनोहर माळगावकरांसारखे लेखक विदेशात चकरा टाकत असतात. पण ह्यातून समकालीन जिवंत रसरशीत भाषा हाती येईल असे वाटत नाही. ह्याशिवाय आपली मातृभाषा आपण जेवढ्या ताकदीने वाकवू शकतो, तिचे व्याकरण स्वत:ला हवे तसे नाचवू शकतो तसे परक्या भाषेत होऊच शकत नाही. म्हणूनच इंग्रजी ह्या परभाषेत लिहिणाऱ्या लेखकांना नेमाडेंनी केलेला विरोध कुणीही मान्य करेल. आर. के. नारायणच्या गाईडपासून ज्यांना इंग्रजीतील सुहास शिरवळकर म्हणता येईल त्या शोभा डेच्या 'स्टारी नाईट', 'ऑब्सेशन'पर्यंत जी काही निर्मिती इंग्रजीतून दिसते ती अत्यंत दुय्यम दर्जाचीआहे. सर्वात वाईट गोष्ट म्हणजे आपण काय लायकीचे लिहितो हे ह्या लोकांनाही कळत नाही. किंबहुना इंग्रजीतून लिहिण्याचे फायदे उपटण्यासाठीच हा खटाटोप चाललेला दिसतो. मात्र मला इथे एक प्रश्न पडतो, तो म्हणजे ह्या लोकांचा नेमका दोष काय? ते ज्या भाषेत लिहितात ती भाषा, की ह्यांच्या आकलनाची कुवत ? नेमाडे फक्त पहिले कारणच ह्या पाठीमागे असल्याचे सांगतात. मला वाटते दुसरे तितकेच महत्त्वाचे आहे. कॉन्व्हेंन्टमध्ये शिकलेल्या बऱ्याच लोकांच्या ह्या देशाविषयी इतक्या विनोदी कल्पना असतात की त्यांना हसावे की रडावे हाच प्रश्न पडावा. हे लोक एका विशिष्ट वर्गात वाढल्याने ह्यांच्या डोक्यात अनेकदा सावळा गोंधळ असतो आणि जीवनाविषयीचे गांभीर्य नष्ट झालेले असते. गिरीश कर्नाडच्या हयवदन नाटकातील घोड्यासारखी ह्यांची अवस्था असते. इंग्रजी डोके आणि देशी धड ह्यामुळे ही माणसे स्पर्धेच्या युगात दोन पायांच्या घोड्याच्या वेगाने धावतात. त्यांचे डोके इंग्रजी असल्याने त्याची दिशा अनेकदा चुकलेली असते. एकीकडे शैक्षणिक सोयींना पारखा झालेला, चांगल्या

शिक्षकांच्या अभावामुळे कसाबसा तगलेला मातृभाषिक विद्यार्थी तर दुसरीकडे सगळ्या सोयी उपलब्ध होऊनही ज्याची सर्जनशीलता सपाट आणि पुचाट झालीये असा कॉन्व्हेंन्टचा वर्ग अशी ही अवस्था आहे. ह्यांना मिळणाऱ्या सोयी व शिक्षण मातृभाषी विद्यार्थ्याला मिळाले असते तर तो निश्चितच भरधाव व योग्य दिशेने धावला असता असे वाटत राहते. आज ह्या शिक्षणाच्या दोन्ही आघाड्यांवर आपणाला अपयशच मिळालेले दिसते. एकीकडे देशी शिक्षणाचे डबके झालेय तर दुसरीकडे इंग्रजी शिक्षणाचा समुद्र झालाय. पिण्याचे पाणी मात्र कुणाकडेच नाही. जोपर्यंत कॉन्व्हेंन्टचा दर्जा आणि मातृभाषेचे माध्यम ह्या दोन गोष्टी एकत्र नांदत नाहीत तोपर्यंत इथल्या शिक्षणाचे काही खरे नाही. ह्या कॉन्व्हेंन्टमध्ये वाढलेले लोक जेव्हा लिहितात तेव्हा ते ह्या समाजाविषयी काय लिहिणार? त्यांचे आकलन काय असणार ? मला एक प्रश्न नेहमीच पडतो. इंग्रजीचे मंगेश पाडगावकर निरस्सीम इझिकेलनी समजा मराठीत लिहिले असते तर त्यांनी असे काय दर्जाचे लिहिले असते ? ह्या लोकांनी मातृभाषेत खरोखर ग्रेट लिहिले असते ? मला तरी शंका वाटते. त्यांनी मातृभाषेत अधिक उत्तम लिहिले असते ह्याविषयी शंका नाही; पण त्यांनी मातृभाषेत थोरच लिहिले असते ह्याची मात्र कोणतीही खात्री देता येत नाही. नेमाडेंनी हा मुद्दा लक्षात घेतलेला नाही. म्हणून त्याचा उल्लेख करतोय. इंग्रजी लेखनाचे मूल्यमापन करताना केवळ इंग्रजी भाषा लक्षात घेऊन चालणार नाही तर ह्या लेखकाचे मुळचे वाङ्मयीन व्यक्तिमत्त्व किती प्रभावी आहे तेही पाहिले पाहिजे. थोडक्यात, ज्यांची मातृभाषा, कुटुंबभाषा इंग्रजेतर आहे आणि तरीही जे इंग्रजीत लिहितात त्यांनी इंग्रजीत न लिहिता मातृभाषेत लिहावे हे उत्तम; अर्थात विज्ञान ह्याला अपवाद आहे. वर्तमानपत्रेही ह्याला अपवाद ठरू शकतात. एरव्ही मात्र मातृभाषाच वापरावी हे उत्तम. जर आंतरराष्ट्रीय होण्याची फारच हौस असेल तर अशा लोकांनी आपले सर्जनशील लेखन मातृभाषेतून इंग्रजीत अनुवादित करावे. अर्थात इंग्रजी-फ्रेंच, मराठी-हिंदी, मराठी-गुजराती ह्यांसारख्या जोड्या ह्याला अपवाद ठरतील.

ह्या व्यवहारात सर्वांत गोची करणारा मुद्दा उपस्थित होतो तो म्हणजे ज्यांचे आईवडील दोघेही इंग्रजी भाषिक नाहीत, पण दोघांची संपर्कभाषा इंग्रजी असल्याने ज्यांची कुटुंबभाषा इंग्रजी आहे अशा लोकांनी काय करायचे? हा मुद्दा उपस्थित होण्याचे एकमेव कारण म्हणजे हिन्दीचा राष्ट्रभाषा म्हणून स्वीकार करायला दक्षिण भारतीयांनी दिलेला नकार. त्यामुळे दाक्षिणात्य व उत्तर भारतीय यांचा विवाह झाला की हा मुद्दा उपस्थित येतो. ह्याला उत्तर असे की, असे लोक धड एक टक्काही नाहीत. त्यामुळे त्यांनी नव्व्याण्णव टक्क्यांचे भाषिक धोरण स्वीकारावे. केवळ मूठभर लोकांसाठी संपूर्ण भाषिक धोरण बदलायची काहीच गरज नाही. सरकारने फार तर ह्या

देशात एक टक्का इंग्रजी माध्यमाच्या शाळा खोलाव्यात किंवा तशी परवानगी द्यावी. ह्या एक टक्क्यांनी इंग्रजीत लिहावे आणि नंतर त्यांनी ते हिन्दीत अनुवादित करावे. ह्या लोकांची मातृभाषा इंग्रजी म्हणून तिला मान्यता द्यावी. उद्या एखादे फ्रेंच जोडपे इथे भारताचे नागरिक होईल. जपानी जोडपे भारताचे नागरिक होईल. ह्या सगळ्यांसाठी नव्व्याण्णव टक्के लोकांनी बदलण्यापेक्षा ह्यांनीच नव्व्याण्णव टक्क्यांप्रमाणे स्वत:ला बदलावे हे उत्तम. ह्याला पर्याय नाही. ह्यांनी इथली भाषा शिकावी आणि इथल्या भाषेतील ग्रंथांचे इंग्रजीत अनुवाद करून ह्या देशाची भाषिक सेवा करावी. त्यामुळे त्यांनाही उपरेपणा वाटणार नाही आणि ही संस्कृती आंतरराष्ट्रीय होण्यासाठी त्यांचा हातभार लागेल आणि ह्या अवकाशात ते मुरून जातील. नेमाडेंनी हा मुद्दा मांडलेला नाही म्हणून मी मांडला.

नेमाडेंनी अनुवादाविषयी जे समीक्षात्मक लिखाण केले आहे ते सुंदर समीक्षेचा वस्तुपाठ ठरावा. मी त्यातला अधिकारी नाही, त्यामुळे त्याविषयी मी लिहिणे बरे नव्हे. मात्र अरुण कोल्टकरांच्या जेजुरीविषयीची त्यांची काही मते मला पटलेली नाहीत. अरुण कोल्टकरांच्या मराठी कवितेचे वैभव जेजुरीत प्रकट होत नाही, हे नेमाडेंचे निरीक्षण बरोबर आहे; मात्र कोल्टकरांच्या दृष्टिकोनाला त्यांनी जो आक्षेप घेतलाय तो पटत नाही. समजा, हाच दृष्टिकोन ठेवून कोल्टकरांनी मराठीत जेजुरी लिहिला असता तर नेमाडेंनी तो अमान्य केला असता काय ? माझ्या मते खंडोबा, यल्लमासारख्या देवदेवता म्हणजे ब्राह्मणी जाणिवेचे ह्या देशातील अवशेष आहेत. नेमाडे त्यांचे ज्या भावात्मक पातळीवर समर्थन करतात ते चुकीचे आहे. नेमाडेंनी जरा ह्या अंधश्रद्धांखाली चालणारे शोषण पुन्हा नीट पहावे आणि मग कोल्टकर ह्या सर्वांकडे खवचटपणे पाहतात म्हणून टीका करावी. मला कोल्टकरांचे वाईट वाटते ते खवचटपणाविषयी नाही, तर त्यांना केवळ अंधश्रद्धा दिसते पण त्यामागचे शोषण दिसत नाही. म्हणून देवदासी मुरली नावाखाली स्त्रियांची जी विटंबना चाललीये ती पाहता कुठलाही शहाणा माणूस खंडोबा, यल्लमाकडे खवचटपणानेच पाहील. माझी जेजुरीबाबत तक्रार आहे ती हीच की, कोल्टकरांच्या खवचटपणाला विद्रोहाची धार नाही. किंबहुना कोल्टकर काय किंवा चित्रे काय, दोघेही सॉफिस्टिकेटेड वारकरी आहेत. त्यांचे हे सॉफिस्टीकेशन त्यांच्या मराठी कवितातूनही लपत नाही. जेजुरीत कोल्हटकर टुरिस्टसारखे वावरतात, तर मराठीत ते सॉफिस्टिकेटेड भटक्यासारखे वावरतात एवढेच. खुद्द नेमाडे वारकरी चळवळीच्या सॉफिस्टिकेटेड ॲनॅलिसीसमधून फारसे मुक्त नाहीत हे त्यांच्या 'वारकरी चळवळीची आविष्कारशैली' ह्या निबंधात स्पष्ट जाणवते. ह्या चळवळीविषयीचा नेमाडेंचा गहिवर हा रोमॅण्टिक आहे. ह्या चळवळीत संतांच्या कुठल्याही शिकवणुकीचा लवलेश आढळत नाही. नवस बोलायला,

विठ्ठलाजवळ काहीतरी मागायला, केवळ स्वत:च्या भौतिक इच्छांची पूर्ती व्हावी म्हणून ह्या वारीत भाग घेणाऱ्या लोकांची संख्या प्रचंड आहे. कित्येक बायका घरकामातून सुटका, सुनेपासून सुटका, सासूपासून सुटका वगैरे गोष्टीसाठी वारीत भाग घेतात. विठ्ठलाची कृपा ह्या लोकांना तृष्णेंच्या पूर्ततेसाठीच हवी असते आणि साईड इफेक्ट म्हणून मोक्ष हवा असतो. त्यामुळेच प्रत्यक्ष वारीत जातीच्या भिंती तशाच राहतात. विठ्ठलाविषयी कुणालाच काहीही देणे-घेणे नसते. थोडक्यात, पंढरपूरची वारी हा मराठी संस्कृतीचा मोठा आध्यात्मिक फुगा आहे. नेमाडेंसारखे लोक तो फुगवत असतात. पाश्चात्त्यांना असले प्रोग्राम इंटरेस्टिंग वाटतात. दोघेही त्यावर गहिवरून बोलतात लिहितात. विठ्ठल, खंडोबा, बिरोबा, यल्लमा त्यामुळे इंटरनॅशनल होतात. भारताचे प्रश्न तिथेच राहतात. नेमाडे, चित्रे, चन्द्रकात पाटील प्रभृतींना आपली मुळे परंपरेत रुजल्याचे सो कॉल्ड सॅटिसफॅक्शन मिळत राहते. मूक बधिरांची दिण्डी चालूच राहते आणि त्यावरची कविताही !



# भारतीय शिक्षणव्यवस्था आणि मराठी माध्यमाचा प्रश्न (पुरवणी)

चित्रकार केवळ डोळ्यांनी बघत नाही तर तो हे जग कानांनी ऐकतो. त्वचेने स्पर्शतो. जिभेने आस्वादतो. नाकाने हुंगतो आणि नंतर ह्या साऱ्यांची व्यवस्था तो रंगाने व आकाराने लावतो. कॅनव्हासमध्ये केवळ रेषा आणि रंग नसतात, तर कॅनव्हासमध्ये ध्वनी असतात. गंध असतो. पदार्थाचा स्वाद असतो. स्पर्श असतो. तुम्हाला जर केवळ चाफ्याचा रंगाकार हवा असेल तर व्यावसायिक फोटोग्राफरकडे जा, पण तुम्हाला त्याचा गंधही हवा असेल तर तुम्हाला कलावंताकडेच यावे लागेल. चित्रकार सर्वांगाने आयुष्य भोगतो आणि डोळ्यांच्या अंगाने व्यक्त करतो. लेखक सर्वांगाने आयुष्य भोगतो आणि शब्दांच्या अंगाने व्यक्त करतो. गायक सर्वांगाने आयुष्य भोगतो आणि सूरांच्या अंगाने व्यक्त करतो म्हणजेच कलावंत open space मध्ये आयुष्य भोगतो आणि close space मध्ये व्यक्त करतो. ह्या close space ची खोली, लांबी, रुंदी open space च्या वाढीवर अवलंबून असते. आपण जेव्हा ॲकेडमिक शिस्तीत शिकतो तेव्हा आपण फक्त close space मध्ये कसे व्यक्त व्हायचे हेच शिकतो. open

space मध्ये कसे वाढायचे हे मात्र आपण शिकत नाही आणि मग आपण अधिकाधिक close होत जातो. प्रत्येक +ve space मागे प्रचंड -ve space असते ही साधी गोष्ट आपण विसरतो. कविता ही केवळ शब्दात नसते तर ती दोन शब्दांच्या दरम्यान असते. चित्रकला हीही केवळ +ve space मध्ये नसते. -ve space मध्येही असते. ज्याला -ve space कळते त्याला +ve space कळते. ज्याला open space कळते त्यालाच close space उमगते. मूल close space मध्ये वाढत असले तरी त्याला जगवणारे घटक open space मध्ये मौजूद असतात. मुलाचा या open space शी संबंध तुटला की ते close space मध्ये घुसमटून मरून जाते. अनेकदा शैक्षणिक संस्था विद्यार्थ्यांचा open space शी असलेला संबंध तोडतात. त्यामुळे ह्या विद्यार्थ्यांतला कलावंत ह्या education system च्या close space मध्येच मारला जातो. अकाली गर्भपात झालेल्या कलावंतांना घेऊन हिंडणारे हे विद्यार्थी पोटातील पोर मरूनही ते पोटात बाळगत हिंडणाऱ्या पोट्टुशी बाईप्रमाणे असतात आणि हे मेलेले पोर पुढे त्या पोट्टुशीलाही मारून टाकते. त्यामुळेच विद्यार्थ्यांना सातत्याने open space मध्ये वाढते ठेवणे हे शिक्षणाचे मुख्य धोरण असायला हवे. आताची शिक्षणपद्धती ही वाढ नाकारते, म्हणूनच मी ह्या शिक्षणपद्धतीला close education system असे म्हणतो. ह्या close space ला सतत open ठेवण्यासाठी सृजनशील कलावंत नेहमीच open spacial workshops च्या शोधात असतात. अलीकडेच ज्यांचे निधन झाले त्या कार्ल प्रॉपर यांनी समाजाचा विचार करताना close society आणि open society अशा दोन संकल्पना सुचवल्या होत्या. त्यांनी मार्क्सवादाला close society तर लोकशाहीला open society म्हटले होते. त्याच धर्तीवर आपण open spacial workshops ना democratic workshops असेही म्हणू शकतो. close society मध्ये beurocracy अनेकदा society ला खाऊन टाकते, तसेच close spacial education system अनेकदा education लाच खाऊन टाकते; म्हणून open spacial workshops सतत क्रियाशील असणे अत्यंत आवश्यक असते. ह्याचा अर्थ open space आणि close space ह्यांच्यात झगडाच असायला हवा असे नाही. भारतीय परंपरेत एक दृष्टांत नेहमीच दिला जातो. तुम्ही एखादा रेषाखंड लहान आहे हे कसे सिद्ध कराल ? तर त्याच्या शेजारी अधिक मोठा रेषाखंड काढून ! मोठा रेषाखंड लहान रेषाखंडाला कापत नाही की पुसत नाही. तो स्वतंत्रपणे वाढतो आणि मोठा होतो. open spacial workshops ही अशा मोठ्या रेषाखंडांची निर्मिती असते. गौतम बुद्धांची एक गोष्ट मला ह्या संदर्भात आठवते. एकदा मोक्षासाठी प्रचंड धडपडून एक ब्राह्मण थकून गौतम बुद्धाकडे आला आणि त्याने मोक्षासाठी

आपण कसे धडपडतो ते सांगितले. बुद्धाने विचारले, ''तुझ्याजवळ आणि तुझ्या आसपास अंधार आहे तर तो अंधार नष्ट करण्यासाठी काय करशील ? त्या अंधाराशी मारामारी करशील ? झगडशील ?'' ब्राह्मण म्हणाला, ''नाही, मी एक दिवा आणून ठेवेन. त्याने अंधार आपोआपच नष्ट होईल.'' बुद्ध म्हणाला, ''बरोबर ! हेच तुला करायचे आहे, अंधार नष्ट करायचा असेल तर अंधार म्हणजे काय ह्याचे शास्त्रीय विश्लेषण करून अंधाराविरूद्ध झगडता येत नाही, तिथे दिवा लावावा लागतो, तर तू अंधाराची काळजी करू नकोस तू स्वतःच एक दिवा बन. 'अप्पो दियो भव', स्वतःचा दिवा स्वतः बन. open spacial workshops, close spacial education system शी झगडत नाही ती फक्त open space open करतात. कुणीही यावे आणि ह्या खुल्या अवकाशाला उपलब्ध व्हावे. हा अवकाश खुला असल्यानेच, मुक्त असल्यानेच तो सर्वांसाठीच खुला आहे. इथे मुक्त धोरण आहे. किंबहुना धोरण नाहीच, इतके ते मुक्त आहे. वाढ ही एक अवकाश रुंदावत, विस्तारत नेणारी प्रक्रिया आहे. लहान मूल वाढते म्हणजे स्वतःचा अवकाश विस्तारते. open spacial workshops ही अशीच अवकाश रुंदावत नेणारी प्रक्रिया आहे. मात्र इथे एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी ती म्हणजे ही प्रक्रिया म्हणजे विकास (डेव्हलपमेंट) नाही, तर ती वाढ आहे growth आहे, विकास हा नेहमीच योजनाबद्ध असतो. म्हणूनच close educational system development वर, विकासावर भर देते. open spacial workshops चा भर वाढीवर असतो. आणि म्हणूनच ती योजनाबद्ध असत नाहीत. ती नेहमीच जे जे बद्ध करते, बांधून ठेवते त्याला खुले करण्यासाठी धडपडतात. त्यामुळेच मला workshops हा शब्दही चुकीचा वाटतो. कारण शॉप ह्या शब्दातसुद्धा एकप्रकारची खरेदी-विक्री अभिप्रेत असते. त्याऐवजी मी growthwork हा नवीन शब्द सुचवेन. open spacial growthworks असे ह्या उपक्रमाचे नवीन नाव ठेवायला हरकत नाही. वाढ घडवून आणणारी खुली अवकाशात्मक कामे किंवा कार्ये असा योग्य अर्थ त्यातून व्यक्त होतो. close spacial education system मध्ये workshops होतात. तर open spacial education system मध्ये growthworks होतात. असेही ह्या पार्श्वभूमीवर म्हणता येईल. ह्या growthworks ची गरज केवळ विद्यार्थ्यांनाच असते असे नाही किंवा कलावंतांनाच असते असे नाही. प्रोफेशनल आर्टिस्ट किंवा कमर्शिअल आर्टिस्टनाही याची तितकीच गरज असते. कारण व्यवसायातही एक close spacial system काम करत असते. त्यामुळेच commercial artist नाही ही growthworks वाढीचे सतत नवीन भान व परिमाण देऊ शकतील. थोडक्यात, ज्यांना कुणाला स्वतःची वाढ व्हावी असे वाटते, ज्यांना कुणाला बुद्धाने म्हटल्याप्रमाणे स्वतःचा दिवा स्वतः बनायचे आहे त्या सर्वांना ही

growthworks खुली आहेत. ह्या growthworks मध्ये कुणी शिक्षक नाही; कारण इथे शिकणारा व शिकवणारा दोघेही वाढत असतात, अणि दोघे एकमेकाची वाढ शेअर करत असतात. म्हणूनच इथे खोट्या अहंकाराला वाव नाही किंवा खोट्या नम्रतेला जागा नाही. मात्र ज्याची वाढ अधिक आहे त्याने त्याची वाढ आपल्याबरोबर शेअर केली ह्याबद्दल कृतज्ञता आहे. ही कृतज्ञता सहज आहे, उत्स्फूर्त आहे. इथे ज्याला स्वतःची वाढ इतरांबरोबर शेअर करता आली आणि त्यामुळे ज्याची स्वतःची वाढही वृद्धिंगत झाली आहे तोही ऋणी आहे.

वाढ ही कधीच एका अंगाने होत नाही. किंबहुना एका अंगाने होणारी वाढ ही विकृतीच असते. एखादा चित्रकार म्हणाला की, मी फक्त डोळ्याच्या अंगाने वाढणार तर त्याला डोळ्यांचा हत्तीरोग होईल. एखादा गायक म्हणाला की, मी फक्त गळ्याच्या अंगाने वाढणार तर त्याला गळ्याचा हत्तीरोग होईल. कुमार गंधर्व नेहमी म्हणायचे की, मला स्वर केवळ ऐकू येत नाहीत तर मला स्वर दिसतो. तर त्यांच्यासाठी स्वरांचे दिसणे, स्वरांची चित्रकला ही तितकीच महत्त्वाची होती. प्राचीन मिनिएचर्स चित्रकारीतले गुरू नेहमी म्हणायचे की, आम्हाला रेषा केवळ दिसत नाहीत तर आम्हाला रेषा ऐकू येतात. रेषा आणि रंग केवळ दिसून उपयोगी नाहीत, तर ते ऐकू आले पाहिजेत. नाचले पाहिजेत. बोलले पाहिजेत. गायिले पाहिजेत. कुठलेही चांगले चित्र केवळ डोळ्यात उमटत नसते. ते कानांना ऐकू येते. ते बुद्धीशी बोलत राहते. ते त्वचेवरून झुळझुळत वहाते. ते अंगाखांद्यावर नाचत रहाते. म्हणूनच कलावंताची वाढ ही सर्वांगाने व्हायला हवी. open spacial growthworks त्यामुळेच स्वतःला एका कलेत बंदिस्त करत नाहीत. ती बहुकलावादी (multiartistic approach) भूमिका स्वीकारतात. त्यामुळेच अशा growthworks मध्ये चित्रकला, संगीत, नृत्य, साहित्य, समीक्षा, अभिनय वगैरे सर्व कला सुखेनैव एकत्र नांदत असतात. इथे interdependence च्या तत्त्वाला प्रमाणतत्त्व म्हणून स्वीकारले जाते. या तत्त्वानुसार survival is the fittest ह्या डार्विनच्या तत्त्वापेक्षा interdependency ला महत्त्व असते. म्हणजे असे की, वनस्पती कार्बन-डॉय-ऑक्साईड घेतात आणि ऑक्सिजन सोडतात. तर प्राणी ऑक्सिजन घेतात व कार्बन-डॉय-ऑक्साईड सोडतात. दोघे एकमेकांवर dependent असतात, म्हणूनच दोघेही जगतात आणि वाढतात आणि त्यामुळेच पर्यावरणाचा तोलही शाबूत राहतो. कलाक्षेत्रातही पर्यावरणाचा हा तोल पूर्वी होता. इंग्रजांच्या आगमनानंतर तो पूर्ण ढासळला आणि ह्या शतकात तो पूर्ण लयाला गेला. याउलट युरोपमध्ये हा तोल कधीच ढळला नाही उलट तो वाढतच गेला. त्यामुळेच तिथे कोणतीही कलात्मक चळवळ ही केवळ एका कलेत झाली नाही तर सर्वच कलांत झाली. आधुनिक भारतीय कलावंतांना ह्या

तत्त्वाचा जणू विसर पडला आहे. तर शैक्षणिक संस्था हा तोल पूर्णपणे विसरून गेल्यात. त्यामुळेच भारतीय कलाक्षेत्रात एक अराजक पसरलेले दिसते. चित्रक लेत काय चालले आहे याची साहित्यिकांना खबर नसते. तर साहित्यात काय चालले आहे याची गायकांना खबर नसते. अनेकदा तर सररीयालिस्टिक चित्रकाराला कविता मात्र रोमॅण्टिक आवडत असतात. तर शास्त्रीय संगीतात आधुनिक असणारा गायक मॉडर्न कविता किंवा चित्रकला म्हणताच नाक मुरडू लागतो. एकमेकाच्या समकालीन जाणिवांचे प्रतिबिंब एकमेकात पडत नाही. परिणामी सर्वांच्याच वाढी खुंटतात. हे टाळायचे असेल तर सर्व कलाकारांनी कलांचे हे परस्परपूरक नातेसंबंध लक्षात घेतले पाहिजेत. growthworks ही परस्परपूरकता लक्षात घेऊनच काम करत असतात आणि म्हणूनच ती सर्वांगिण वाढीच्या सर्वांगिण शक्यतांना खुली रहातात. ती सर्वच कलांना त्यातील शक्यतांना अजमावून पहातात. इथेच ती वर्कशॉपपेक्षा वेगळी पडत जातात. कुठल्याही growthworks ची वाढ ही ती सर्व कलांबाबत कोणती आणि कशा प्रकारे कार्य करतात त्यावर अवलंबून असते. growthworks ची ही सर्वांगीण पार्श्वभूमी लक्षात घेतली की, open spacial growthworks च्या अनेक शक्यता आपणाला आपोआपच दिसू लागतात आणि आतापर्यंत कधी न जाणवलेला कॅनव्हास, न जाणवलेली -ve space, न जाणवलेली open space आपल्याभोवती फेर धरून नाचू लागतात.आपल्या अस्तित्वाची मुरली सर्वांगाने वाजू लागते. growthworks चे खरे काम अशी सर्वांगाने मुरली वाजवणे हेच आहे.

